॥ ॐ ॥

श्रीमत्पूज्यपाद - स्वामिकृत

# समाधिशतक.

[ पं. प्रभाचंद्र यांच्या संस्कृत टीकेसह. ]

-: अनुवादक :-

**रावजी नेमचंद शहा, वकील, सोलापूर,**

जैनधर्मादर्श, श्रीमहापुराणामृत, सामायिक पाठ, जैनधर्मावरील अक्षिप्त विधानें व निरसन, सोलापूर-जिल्हा-साहित्य-सूचि इत्यादि ग्रंथांचे कर्ते व अनुवादक तसेंच

कविसम्राट श्री जिनसेनाचार्य व गुणभद्राचार्य, श्रीमदमृतचंद्रसूरि, श्रीमत् पूज्यपाद स्वामिप्रभृति आचार्यांचे चरित्रकार.



-: प्रकाशक :-

**श्रीजिनवाणी प्रसारक चारित्रचक्रवर्ति श्रीमदाचार्य शांतिसागर दिगंबर जैन-शासनमाला, मालगांव.**

-: मुद्रक :-

बी. एन्. कुलकर्णी, प्रोप्रायटर, एस्. बी. लिथो प्रेस, सांगली.

| द्वितीय आवृत्ति | श्रीवीरनिर्वाण संवत २४६४. सन १९३८.<br>मूल्य सदुपयोग | प्रती १०००. |
|---|---|---|

# समाधिशतक प्रकाशकांची नावे

## २०० प्रति सहायकः—

श्रावक श्राविका-समडोळी, ( जि. सातारा. )

## २०० प्रति सहायकः—

व्हनापा सत्यापा मुरचिटे, सत्यापा कल्लापा चौगुले व सहायक-श्रावक श्राविका, रुई ( इ. करवीर. )

## १०० प्रति सहायकः—

कृष्णाबाई भ्र० परगौंडा पाटील, रुक्मिणीबाई भ्र० सातापा मोगे व सुंद्राबाई भ्र० भाऊ भेंडवाडे, माणगांव ( सं. कागल )

## २०० प्रति सहायकः—

समस्त सावकारी श्रावक श्राविका.

## १०० प्रति सहायकः—

श्री. ध. दा. जिनवाणी भू. वि. भू.—रावजी सखाराम दोशी व श्री. शे. फुलचंद रावजी शहा, सोलापूर.

---

# अनुवादकाची प्रथमावृत्तीची

# प्रस्तावना.

जयन्ति कुमतध्वान्तपाटने पटुभास्कराः ॥
विद्यानन्दाः सतां मान्याः पूज्यपादा जिनेश्वरः ॥१॥

सध्यांच्या कालाला पाश्चात्य इतिहासज्ञ लोक 'ज्ञानयुग' असें म्हणतात. त्याप्रमाणें सध्यां इतर शास्त्रांबरोबर तत्त्वज्ञानवृद्धीचा प्रयत्न सर्वत्र जारीनें सुरू आहे. आम्हां जैन लोकांत मात्र आजकाल बरेंच अज्ञान दृष्टीं पडतें. ह्याचें कारण आमच्या तत्त्वज्ञानाचीं साधनें नाहींत व तीं आम्हांला नवीन उत्पन्न केलीं पाहिजेत, हें नसून, आमची त्याविषयीं अनास्था हेंच होय. आमच्यांत ज्ञानाचीं साधनें इतकीं विपुल आहेत कीं, तितकीं साधनें दुसऱ्या लोकांत क्वचित्‌च आढळतील. मग प्रश्न असा कीं, अशीं व इतकीं साधनें असूनही आमचा समाज अज्ञानी कां? ह्याचें उत्तर वर 'अनास्था' हें दिलेंच आहे. आतां ही अनास्था तरी कां उत्पन्न झाली? असा येथें कोणी प्रश्न विचारतील; त्याचें उत्तर मात्र देणें कठीण आहे. तथापि आम्ही आमच्या अल्प समजुतीप्रमाणें ह्याचें उत्तर सांगतों. आमचीं ज्ञानाचीं साधनें म्हणजे आमच्यांतील प्राचीन महापंडितांनीं व आचार्यांनीं आमच्यावर उपकार करण्याकरितां लिहून ठेवलेले नानाविध विषयांवरील ग्रंथ हीं होत,

प्राचीन काळीं आमच्यांत असा संप्रदाय होता कीं, हे ग्रंथ संस्कृत भार्षेत असल्यामुळें सर्वांस समजण्यास कठीण पडत असत; म्हणून त्यावेळचे पंडित लोक त्या त्या देशांत प्रचलित असलेल्या देशभार्षेत त्यांचीं भाषांतरें करीत असत. त्यायोगानें ग्रंथ आबाल-वृद्धांच्या उपयोगी पडत असत. ह्या संप्रदायाला अनुसरून आमच्यांतील तत्त्वप्रतिपादक कित्येक ग्रंथ संस्कृत भाषेंत, कित्येक मागधी भार्षेत व कित्येक हिंदुस्थानी भार्षेत आणि कित्येक कानडी भार्षेतही केलेले आहेत. हे तत्त्वज्ञानाचे ग्रंथ देशभार्षेत झाल्याकारणानें सर्व लोकांना तत्त्वज्ञान सुलभपणानें प्राप्त करून घेतां येत असें. आमच्या महाराष्ट्रभार्षेत मात्र तत्त्वज्ञानाचे ग्रंथ अद्याप झालेले नाहींत. व प्राचीन ग्रंथ आहेत ते अन्यभाषांतून असल्याकारणानें त्या त्या भाषांचें उत्कृष्टज्ञान संपादन केल्यावांचून ते समजणें शक्य नाहीं. त्यामुळें आमच्या लोकांची तत्त्वज्ञानाविषयींची आस्था नाहींशी झाली आहे. तत्त्वज्ञानाचे ग्रंथ देशभार्षेत झाले असतां लोकांना तत्त्वज्ञान देखील थोड्या प्रयासानें साध्य करून घेतां येईल. आतां तत्वज्ञान हा विषय मोठा गंभीर असल्यानें कादंबऱ्या वाचून जशा गोष्टी समजतात तसें तें समजणें शक्य नाहीं, ही गोष्ट जरी खरी आहे; तथापि, एकेका भाषेचें चांगलें ज्ञान संपादन करण्यास जो व्यर्थ काल घालवावा लागणार आहे, त्या तितक्या कालांत देशभार्षेत जर ग्रंथ असतील तर ते वाचून मनुष्याला तत्त्वज्ञान संपादतां येईल ह्यांत मुळींच शंका नाहीं. असो! तेव्हां ही उणीव आमच्या समजुतीप्रमाणें

आम्हांस वाटल्यामुळें ती अंशतः तरी दूर करण्याकरितां आम्हीं 'श्रीपूज्यपादस्वामिकृत समाधिशतक' ह्या ग्रंथाचें भाषांतर करण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे. तो आमच्या सधर्मी बांधवांना प्रिय वाटून त्याच्या वाचनाविषयीं त्यांची प्रवृत्ति झाल्यास भाषांतर कर्त्याच्या श्रमांचें साफल्य होणार आहे. असो!

आतां ग्रंथकार श्रीपूज्यपादस्वामी ह्यांच्या चरित्रासंबंधानें जी माहिती आम्हांस उपलब्ध आहे तिचा वाचकांना थोडासा परिचय करून देऊं. *श्रीपूज्यपाद भगवान् ह्यांचा जन्म केव्हां,* कोणत्या जातीमध्यें व कोणत्या कुलांत झाला ह्याबद्दल अशी माहिती मिळते कीं, शालिवाहन शकाचीं तीनशेहे वर्षे झाल्यावर कर्नाटकांत 'कोळगांव' नांवाच्या गांवांत माधवभट्ट नांवाच्या ब्राह्मणापासून श्रीदेवी नांवाच्या स्त्रीच्या ठिकाणीं श्रवण नक्षत्रावर ह्या महात्म्याचा जन्म झाला. यांनीं जैनशास्त्रांत अतिशय प्रावीण्य संपादन केलें, आणि अल्पवयातच जिनदीक्षा घेतली. स्याद्वादभूषण पंडित कल्लापा भरमाप्पा निटवे ह्यांनीं संस्कृत सर्वार्थसिद्धीच्या प्रस्तावनेंत श्रीपूज्यपादाचार्यासंबंधानें खालील श्लोक दिलेले आहेत—

श्रीगृध्रपिच्छमुनिपस्य बलाकपिंच्छः ।
शिष्योऽजनिष्ट भुवनत्रयवर्तिकीर्तिः ॥
चारित्रचञ्चुरखिलावनिपालमौलि- ।
मालाशिलीमुखविराजितपादपद्मः ॥ १ ॥

एवंमहाचार्यपरम्परायां ।
स्यात्कारमुद्राङ्किततत्त्वदीपः ॥
भद्रः समन्ताद्गुणतो गणीशः ।
समन्तभद्रोऽजनि वादिसिंहः ॥ २ ॥

यो देवनन्दिप्रथमाभिधानो ।
बुद्ध्या महत्या स जिनेन्द्रबुद्धिः ॥
श्रीपूज्यपादोऽजनि देवताभि- ।
र्यत्पूजितं पादयुगं तदीयम् ॥ ३ ॥

—श्रवणबेळगोळ शिलालेख नंबर ४० (६४)

जैनेन्द्रं निजशब्दभागमतुलं सर्वार्थसिद्धिः परा ।
सिद्धान्ते निपुणत्वमुद्धकविता जैनाभिषेकः स्वकः ॥
छन्दः सूक्ष्मधियं समाधिशतकं स्वास्थ्यं तदीयं विदा- ।
माख्यातीह स पूज्यपादमुनिपः पूज्यो मुनीनां गणैः ॥ ४ ॥

—श्रवणबेळगोळ शिलालेख नंबर ४०

ह्यावरून पूज्यपाद आचार्यांचें पहिलें अथवा दीक्षेच्या वेळचें नांव 'देवनंदी' असें होतें. त्यांनीं जैनागमादि सर्व शास्त्रांत प्राविण्य मिळविल्यामुळें व अतुल अशा प्रज्ञावैभवामुळें त्यांना त्यांच्या तपश्चरणाच्या पुण्यप्रभावानें 'जिनेंद्रबुद्धि' म्हणत असत. देवता त्यांचे चरण पूज्य मानूं लागल्याकारणानें त्यांचें पूज्यपाद हें नांव पडलें. गणरत्नमहोदधीच्या कर्त्यानें ह्यांनाच 'चंद्रगोमि' म्हटलें

आहे. ह्या शिवाय 'दिग्वस्त्र' 'इन्द्रनन्दी' ही देखील त्यांचींच नांवें होतीं. ह्या नांवावरून त्यांच्या अतुल बुद्धिमत्तेची सहज कल्पना येते. श्रीपूज्यपाद आचार्यांनीं जी दिक्षा घेतली, ती मूलसंघाचे ( दिगंबरसंप्रदायाचे ) जे नंदिसंघ, देवसंघ, सेनसंघ आणि सिंहसंघ असे चार भेद आहेत; त्यांपैकीं पहिल्या '**नंदिसंघाच्या**' परंपरेंत घेतली. ते ह्या संघांतील दहावे प्रख्यात मुनि होत. ही गोष्ट जैनहितैषी मासिकाचे विद्वान् संपादक पं. श्रीयुत नाथूराम प्रेमीजी ह्यांनीं जैनहितैषी मासिकाच्या सहाव्या वर्षाच्या सातव्या व आठव्या अंकांत जी गुर्वावली व पट्टावली प्रसिद्ध केली आहे, तीवरून स्पष्ट होते. महाकवी पंप यानें आपल्या काव्यारंभीं समंतभद्र व आमचे चरित्रनायक श्रीपूज्यपाद यांना नमस्कार केला आहे. याशिवाय अनेक कर्नाटक कवींनीं त्यांना आपापल्या ग्रंथांतून स्तुतिसुमनें वाहिलीं आहेत.

हे आचार्य होऊन गेल्यास आज चवदाशें वर्षें झालीं असावींत असें बऱ्याच महत्त्वाच्या पुराव्यावरून सिद्ध करतां येण्यासारखें आहे. जैनांतील प्रसिद्ध इतिहाससंशोधक पं० पन्नालाल बाकलीवाल व पं० वंशीधर ह्या दोन विद्वानांनीं सनातनजैन-ग्रंथमालेच्या प्रथमगुच्छाच्या उपोद्घातांत "समाधिशतकं ४०१ तमे विक्रमाब्दे देवनन्दीत्यपरनामा स्वामी श्रीपूज्यपादो भगवान्निर्ममौ" असें लिहिलें आहे. म्हणजे समाधिशतक हा ग्रंथ विक्रमशतकाच्या ४०१ ह्या वर्षीं श्रीपूज्यपादांनीं लिहिला आहे असें म्हटलें आहे. जैन ग्रंथांत जेथें 'विक्रमाब्द' असा शब्द असेल तेथें तो शालिवाहनशक समजावा. कारण, शालिवाहनाला देखील विक्रम असें नांव होतें;

अस अलीकडील शोधावरून ठरलेलें आहे. अर्थात् समाधिशतक शालिवाहनशकाच्या चारशें एक ह्या वर्षी केलें हें सिद्ध होतें. मे. राईस साहेब ह्यांनीं हेब्बूर येथील ताम्रपटावरून 'पूज्यपाद हे गंगवंशांतील दुर्विनीत राजाचे गुरु होऊन इसवी सन ४७८ पासून ५१३ पर्यंत राहिले होते' असें लिहिलें आहे. तसेंच 'पूज्यपादांचे शिष्य वज्रनंदी यांनीं इसवी सन च्यारशें सत्तर मध्यें द्राविडसंघ स्थापना केला' असें 'दिगंबरदर्शन' ह्या ग्रंथावरून समजतें. हा ग्रंथ बॉंबे रॉयल एशियाटिक सोसायटी जनरल नंबर ४४ व्हाल्यूम १७ पेज ७४ मध्यें नमूद केलेला आहे. [ शब्दानुशासन उपोद्घात पेज १८ पहा. ] राजावली ग्रंथांत 'विक्रमार्क राजानंतर ५९६ वर्षांनीं श्रीपूज्यपादांचे शिष्य वज्रनंदी यांनीं द्राविड मत स्थापन केलें' असें लिहिलें आहे. ह्या सर्व प्रमाणांवरून श्रीपूज्यपादस्वामी हे इसवीसनाच्या पांचव्या शतकांत होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यावरून आम्हीं जो वर अंदाज लिहिला, तो पुष्कळ अंशीं खरा ठरतो. ह्या आचार्यासंबंधानें वृद्धलोकांच्या तोंडून एक कथा ऐकण्यांत आली आहे. ती अशी — श्रीपूज्यपाद ह्यांनीं बाल्यांतच जिनदीक्षा घेतली. नंतर ते दक्षिणेंतील पर्वतावर तपश्चर्या करित होते. पुढें ते 'पडुनाडु' नांवाच्या देशांत तपश्चर्येस गेले. तेथें त्यांना तीर्थवंदना करण्याची इच्छा झाली. त्याकरितां ते आंध्र, कर्नाटक वगैरे देशांतून विहार करीत निघाले. जातां जातां 'कौगले' पर्वतावर आले. तेथें त्यांनीं जैनागमाचा अभ्यास केला. परंतु शिकविणार चांगला नसल्यामुळें त्यांची जिज्ञासा पूर्ण होईना. म्हणून ते पादलेपौषधीच्या

सामर्थ्यानें आकाशमार्गानें विदेहक्षेत्रांत गेले. तेथें समवसरणांत असलेल्या तीर्थंकरास वंदन करून आपल्या सर्व शंका भगवंताजवळ निवेदन केल्या. त्यांनीं त्या सर्व शंकांचा निरास केल्यावर श्रीपूज्यपादस्वामीस जैनागमांतील सर्व तत्त्वें अबाधित असल्याचें निश्चयात्मक ज्ञान झालें. पुनः ते तेथून आकाशमार्गानें येत असतां सूर्यकिरणांच्या प्रखरतापानें त्यांचे डोळे गेले. मग बंकापूर येथें येऊन श्रीशांतिनाथाच्या मंदिरांत त्यांनीं शांत्यष्टकाचा पाठ केल्याकारणानें त्यांच्या नेत्रांचा अंधपणा नाहींसा झाला.

ह्या आचार्यांनीं केलेले ग्रंथ १ पंचाध्यायी, २ इष्टोपदेश, ३ सिद्धिप्रियस्तोत्र, ४ सर्वार्थसिद्धि (श्रीउमास्वाति आचार्यांनीं केलेल्या तत्त्वार्थसूत्रांवरील टीका), ५ श्रावकाचार, ६ पूजाकल्प, ७ जिनसंहिता आणि ८ समाधिशतक हे आठ प्रसिद्ध आहे. यांशिवाय त्यांनीं जिनाभिषेक नांवाचें उच्चकोटीचें काव्य केलें आहे. बुद्धीची सूक्ष्मता दर्शविणारें छंदःशास्त्र रचिलें आहे. यांपैकीं जिनाभिषेक व छंदःशास्त्र हे ग्रंथ अनुपलब्ध आहेत व वैद्यकशास्त्रावरही दोन ग्रंथ केलेले आहेत असें ऐकतो. त्यांपैकीं एकांत चिकित्सा व दुसऱ्यांत औषधी व धान्य यांच्या गुणधर्मांचें विवेचन केलें आहे. यावरून या दोन्ही शास्त्रामधील त्यांचें नैपुण्य स्पष्ट होतें.

महात्मा श्रीपूज्यपाद ह्यांनीं केलेला समाधिशतक हा ग्रंथ आध्यात्मिक असून भव्यजीवांना मोक्षमार्गाला लावणारा आहे. ह्याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग केलेले आहेत. ह्या ग्रंथांत

"आत्मा म्हणजे काय, त्याचे प्रकार किती, आपण कोण आहोंत, काय करतों, काय करावें, काय व्हावें, कशाचा उपभोग करावा, कशाविषयीं प्रेम बाळगावें, कशावर भक्ति करावी, कोणत्या वस्तूंचा त्याग करावा, सांसारिक जीवाला शांततेच्या वातावरणांत कसें रहातां येईल, तसेंच मानवी जीवितांचें अंतिम ध्येय काय आहे? मोक्षप्राप्तीचें तंत्र काय आहे?" इत्यादि विषयांचें विवेचन आचार्यांनीं फारच स्पष्ट पण सुलभ रीतीनें केलें आहे. शुद्धात्म्याचें ज्ञान होण्याकरितां अशुद्धात्म्याचेंहि ज्ञान असणें अत्यावश्यक आहे ह्मणून आत्म्याचे बहिरात्मा, अंतरात्मा, व परमात्मा असे तीन भेद केले आहेत व त्यांचें स्वरूपहि उत्कृष्ट रितीनें समजावून सांगितलें आहे. परमात्म्याचें यथार्थ स्वरूप ओळखण्याची मानवीजन्म हें एक महाविद्यालय असून त्यांत श्रीपूज्यपाद यांनीं प्राध्यापकाचें अद्वितीय काम केलेलें आहे. अशा या उत्कृष्ट ग्रंथाचें मराठी भाषेंत भाषांतर धारा-निवासी पं० प्रभाचंद्र यांच्या टीकेच्या साह्यानें आम्हीं केलें आहे. ज्यांना संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान आहे, त्यांना या व अशा प्रकारच्या पुरातन व प्रासादिक ग्रंथापासून आपली जिज्ञासा तृप्त करितां येते. पण ज्यांना संस्कृत भाषा अवगत नाहीं, व अनेक ग्रंथ वाचण्यास व त्यांतील प्रतिपादित विषय समजून घेण्यास सवड नाहीं, असेंही जिज्ञासू बरेच आहेत; त्यांना जैनागमाचीं प्रमेयें व रहस्यें यथाशक्ति समजावून देण्याकरितां हा प्रयत्न आहे, अर्थात् संस्कृतानभिज्ञ लोकांना या अपूर्व ग्रंथाचा स्वाद घेण्यास मिळावा या हेतूनें हें भाषांतर आम्ही महाराष्ट्र वाचकांस सादर करित आहोंत. अशा या स्वानुभवासंपन्न व कवि-

जनांतील तीर्थंकर असलेल्या योगींद्र ग्रंथकाराच्या ग्रंथाचें भाषांतर करण्याची आमच्या अंगीं मुळींच पात्रता नसल्यामुळें यामध्यें अनेक दोष व चुका राहण्याचा संभव आहे; ही गोष्ट आम्ही प्रांजळपणें वाचकांपुढें कबूल करितों. तरी सुज्ञ व गुणग्राही वाचकांनीं या भाषांतरांतील दोषांकडे लक्ष न देतां त्यांबद्दल क्षमा करावी.

अनुवाद करण्याचेकामीं पं. निटवे, प्रसिद्ध प्राच्यसंशोधक प्रो० पाठक बी. ए., पं. नाथूराम प्रेमीजी व प्रकाशक श्रीयुत फडिया आकलूजकर यांचे आभार मानून ही प्रस्तावना व भगवान् पूज्यपाद आचार्यांचें हें त्रोटक चरित्र संपवितों.

गच्छतः स्खलनं क्वापि भवत्येव प्रमादतः ।
हसन्ति दुर्जनास्तत्र समादधाति सज्जनाः ॥

मिति भाद्रपद वद्य ७.
श्रीवीरनिर्वाण संवत २४३७.
विक्रम संवत १९६७.
ता. १५ सप्टेंबर १९११.

रावजी नेमचंद शहा,
वकील, सोलापूर.

सुखं भूयात्सर्वजन्तूनाम् ।

# प्रस्तावना.

[लेखकः— डॉ० प. ल. वैद्य, एम्.ए., प्राध्यापक वाडिया कॉलेज.]

सोलापूरचे प्रख्यात जैन साहित्यिक व वकील रा. रा. रावजी नेमचंद शहा हे मराठी भाषा जाणणाऱ्या जैन धर्मीय व जैनेतर महाराष्ट्रीयांस परिचित आहेत. त्यांची "जैनधर्मादर्श" आणि "महापुराणामृत" हीं दोन्हीं पुस्तकें त्यांचा जैन धर्माचा व वाङ्मयाचा प्रदीर्घ व सखोल अभ्यास दर्शवितात. आज वरील दोन्हीं पुस्तकें दुर्मिळ आहेत, पण बहुधा लवकरच त्यांचें पुनर्मुद्रण करावें लागेलसें दिसतें. रा. शहा यांचें तिसरें पुस्तक "समाधि-शतक" याची पहिली आवृत्ती सन १९१२ मध्यें प्रसिद्ध झाली व आतां त्याच पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग येत आहे. याबद्दल रा. शहा यांचें अभिनंदन केलें पाहिजे. या पुस्तकांत श्रीमत्पूज्यपादाचार्यांच्या "समाधि-शतक" या आध्यात्मिक आणि अत्यंत महत्त्वाच्या ग्रंथाचें सटीक भाषांतर रा. शहांनीं अत्यंत सुबोध रीतीनें दिलें आहे. त्यावरून जैन व जैनेतर या दोन्ही पंथांच्या अभ्यासकांस मूळ ग्रंथाचा परिचय व रसास्वाद अगदीं सुलभ रीतीनें घेतां येईल अशी आम्हांस आशा आहे. रा. शहा यांनीं प्रथमावृत्तीस एक प्रस्तावना स्वतःच लिहिली आहे; पण या खेपेस त्यांनी ही द्वितीयावृत्तीची प्रस्तावना मला लिहिण्यास सांगितली व या निमित्तानें श्रीमत्पूज्यपादाचार्यांच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं व कालनिर्णयाविषयीं अभ्यास करण्याचा योग आणून दिला याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

पूज्यपादाचार्यांविषयीं आजपर्यंत डॉ. कीलहार्न ( इंडियन ॲंटिक्वेरी भाग १० पान ७५ वगैरे ), प्रो० का. बा. पाठक ( इंडियन

अँटिक्करी भाग १२ पान १९ ), डॉ. बेलवलकर ( संस्कृत व्याकरण शास्त्राचा इतिहास ), पण्डित नथुराम प्रेमी ( जैन हितैषी भाग १४ आणि १५ ), पण्डित जुगलकिशोर मुख्तार ( स्वामी समन्तभद्र, पान १४१ जैनसिद्धान्तभास्कर, भाग ५ पान १ ते १६ ) इत्यादि जैनेतर व जैन विद्वानांनीं पुष्कळ लिहिलें आहेच या वाङ्मयाचा उपयोग करून मला जी थोडी नवीन माहिती देतां येण्याजोगी आहे. ती मी या प्रस्तावनेंत देण्याचा यत्न करीत आहे तथापि वरील विद्वानांचें ऋण फार मोठें आहे ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत घ्यावीं अशी विनंती करणें अगदीं अवश्य आहे.

## चरित्र.

संस्कृत वाङ्मयांत किंबहुना हिंदी वाङ्मयांत प्रसिद्धीस आलेल्या बहुधा सर्व ग्रंथकारांविषयीं विश्वसनीय अशी माहिती उपलब्ध नाहीं. आचार्य पूज्यपाद यांविषयींही अशी विश्वसनीय माहिती मिळत नाहीं, व जी मिळते ती दंतकथेसारखी मिळते. कानडी भाषेंत चंद्रय्य कवीनें पूज्यपादचरित नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे, त्या ग्रंथांत आचार्यां-संबंधीं पुढील माहिती आढळते.

“ कर्नाटकांत कोले गांवीं ब्राह्मणकुलोत्पन्न माधवभट्ट आणि श्रीदेवी यांच्या पोटीं पूज्यपादांचा जन्म झाला. ज्योतिष्यांनीं हा मुलगा त्रिलोकपूज्य होईल असें सांगितल्यामुळें आईबापांनीं त्याचें नांव पूज्यपाद असें ठेविलें. आपल्या पत्नीच्या सांगण्यामुळें माधवभट्टानें जैनधर्माचा स्वीकार केला. माधवभट्टाच्या मेहुण्याचें नांव ‘ पाणिनि ’ असें होतें. त्यासही जैनधर्माचा स्वीकार करण्याविषयीं माधवभट्टानें आग्रह केला पण त्यानें तें न ऐकतां मुडीगुंड गांवीं वैष्णवपंथी संन्यास-

धर्माची दीक्षा घेतली. पूज्यपादांस कमलिनी नांवाची एक धाकटी बहीण होती, तिचें गुणभट्टाशीं लग्न झालें व तिला गुणभट्टापासून नागार्जुन नांवाचा एक मुलगा झाला.

" पूज्यपाद बागेंत हिंडत असतां एका नागानें पकडलेला बेडूक त्यांच्या दृष्टीस पडला; त्यामुळें त्यांस वैराग्य झालें, व त्यांनीं जैन साधूची दीक्षा घेतली."

" पूज्यपादांचा मामा पाणिनि यावेळीं आपल्या व्याकरणाची रचना करीत होता, पण अंतकाळ जवळ आल्यामुळें त्याच्या हातून तें पुरें होण्याचा संभव नव्हता; म्हणून पाणिनि पूज्यपादांजवळ जाऊन म्हणाला कीं माझें हें व्याकरण अपूर्ण राहिल्यास तूं पूर्ण कर. पूज्यपादांनीं पाणिनीचें हें म्हणणें मान्य केलें. पुढें पाणिनी दुष्टध्यानामुळें मरणोत्तर सर्प झाला एके दिवशीं पूज्यपादांस पाहून त्यानें फूत्कार केला, तेव्हां पूज्यपादांनीं त्यास सांगितलें कीं तुझ्या व्याकरणाची पूर्तता करण्याचें माझ्या ध्यानांत आहे. पुढें पूज्यपादांनीं पाणिनीय व्याकरणाची पूर्तता केली. यापूर्वीच पूज्यपादांनीं **जैनेन्द्रव्याकरण, अर्हत्प्रतिष्ठालक्षण** हे ग्रंथ, व शिवाय वैद्यक, ज्यौतिष वगैरे शास्त्रांवरही ग्रंथ लिहिले होते. गुणभट्टाच्या मरणानंतर नागार्जुनास फार दारिद्र्य आलें. पूज्यपादांनीं त्यांस पद्मावती मंत्राचा उपदेश दिला व तो कसा सिद्ध करावयाचा हेंही सांगितलें. पद्मावती नागार्जुनासमोर प्रगट झाली आणि तिनें त्यास सिद्धरस तयार करण्याची वनस्पति दाखवून दिली. या वनस्पतीच्या मदतीनें नागार्जुनानें सोनें बनविण्याची क्रिया हस्तगत केली नागार्जुनाचा गर्वपरिहार करण्यासाठीं पूज्यपादांनीं एका सामान्य वनस्पतीपासून सिद्धरस बनवून दाखविला. नागार्जुनानें सिद्धरसाच्या साह्यानें पर्वत सोन्याचे करण्याचा प्रयत्न चालविला, तेव्हां धरणेन्द्र आणि पद्मावती यांनीं त्यास

तसें न करितां सुवर्णमय जिनमंदिर बनविण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नागार्जुनानें एक सुवर्णमय जिनमंदिर बनविलें व त्यांत पार्श्वनाथाच्या प्रतिमेची स्थापना केली. **पूज्यपादांनीं** आपल्या पायास गगनगामी औषधींचा लेप लावून **विदेहक्षेत्राची** यात्रा केली. यावेळीं त्यांचा शिष्य **वज्रनंदी** यानें आपल्या सहकारी साधूंबरोबर भांडण करून इ. स. ४७० मध्यें द्राविड संघाची स्थापना केली. पूज्यपादाचार्यांचा योगाभ्यास दांडगा होता. एकदां एका देवविमानांत बसून त्यांनीं अनेक तीर्थांची यात्रा केली. मार्गांत एकदां त्यांची दृष्टि नष्ट होऊन त्यांना अंधत्व आलें. यावेळीं त्यांनीं "**शांत्यष्टक**" स्तोत्र रचून आपली दृष्टि परत मिळविली. यानंतर ते आपल्या गांवीं परत आले, आणि त्यांनीं शांत चित्तानें समाधिपूर्वक देह ठेवला."

चंद्रय्यकवीनें पूज्यपाद चरितांत जी माहिती दिली आहे त्यांतील कांहीं गोष्टी असंभाव्य व अतिशयोक्त आहेत असें गृहीत धरलें तरी त्यांपैकीं कांहीं ऐतिहासिक आहेत यांत शंका नाहीं. त्यांचें ग्रंथकर्तृत्व, योगाभ्यास, मंत्रशास्त्राचें ज्ञान, वैद्यक आणि ज्योतिष या शास्त्रांतील प्रावीण्य इत्यादि गोष्टींचा उल्लेख त्यांच्या नंतरच्या आचार्यांनीं बारंबार केलेला आढळतो यांत शंका नाहीं.

श्रवणबेळगोळ येथील शिलालेख नंबर ४० हा शके १०८५ म्हणजे सन ११६३ मधील आहे. या श्लोकावरून पूज्यपादाचार्य हे देवनन्दि, जिनेंद्रबुद्धि आणि पूज्यपाद या तीन अन्वर्थ नांवांनीं प्रसिद्ध होते असें दिसतें. शिलालेख १०८ मध्यें हा जिनेंद्रबुद्धि आणि पूज्यपाद या दोन नांवांचा उल्लेख आहे. नन्दिसंघाच्या पट्टावलींत पूज्यपाद आणि देवनन्दि हीं त्यांचीं नांवें आहेत. याशिवाय देवनन्दि याचा संक्षेप करून 'देव' या नांवाचा उपयोग आचार्य जिनसेन,

वादिराजसूरि आणि पुन्नाटसंघीय जिनसेन यांनीं केला आहे. त्याच-प्रमाणें जिनेन्द्रबुद्धि याचा संक्षेप करून ' जिनेन्द्र ' किंवा ' जैनेन्द्र ' हेंही नांव पुष्कळ ठिकाणीं उपयोगांत आणलेलें आढळतें.

## पूर्वाचार्य व शिष्य परंपरा.

पूज्यपादाचार्य दिगंबर जैनांच्या मूलसंघाचें एक प्रख्यात आचार्य होते. कुन्दकुन्दाचार्यांच्या परंपरेंत जे प्रख्यात आचार्य होऊन गेले त्यांत उमास्वाति किंवा गृध्रपिच्छ बलाकपिच्छ, समन्तभद्र, यांच्या नंतर देवनन्दि किंवा पूज्यपाद यांचें नांव येतें.

## पूज्यपादाचार्यांचा कालनिर्णय.

हेब्बूर ताम्रपट, एपिग्राफिआ. कर्नाटिका, कर्नाटककविचरितें तसेंच देवसेनाचार्यांचा दर्शनसार इत्यादि ग्रंथावरून असें दिसून येतें कीं पूज्यपादाचार्य गंगराजा अविनीत ( इ. स ४३०–४८२ ) व त्याचा मुलगा दुर्विनीत ( ४८२–५२२ ) या दोहोंचेही शिक्षागुरु होते. ज्याअर्थी पूज्यपादाचार्यांचा शिष्य वज्रनंदि यानें इ.स. ४७० मध्यें द्राविड संघाची स्थापना केली असें म्हटलें आहे त्यावरून पूज्यपाद हे त्यावेळीं बरेच वृद्ध–५०–६० वर्षांचे असावेत. हें अनुमान जर खरें ठरलें तर आचार्य पूज्यपादांचा काल इ. स. ४२०–४९० असा ठरेल. इ.सनाच्या पांचव्या शतकांत पूज्यपादाचार्य होऊन गेले असे डॉ. ब्यूलरचें म्हणणेंच योग्य आहे असें माझें मत आहे.

## पूज्यपादाचार्यांचें ग्रंथकर्तृत्व.

पूज्यपादाचार्यांची ग्रंथरचना विविध प्रकारची आहे. व्याकरण-शास्त्रांत ' जैनेन्द्रव्याकरण ' या नांवाचा ग्रंथ देवनन्दि किंवा पूज्यपाद

यांनी केलेला प्रसिद्ध असून यावर पुष्कळ टीका प्रटीका झालेल्या आहेत. त्यांपैकीं अभयनन्दिकृत महावृत्ति, आर्यश्रुतकीर्तिकृत पंचवस्तु, महाचन्द्राची लघुजैनेन्द्र, आणि पंडित वंशीधरशास्त्री यांची जैनेन्द्रप्रक्रिया या चार प्रसिद्ध आहेत. जैनेन्द्रव्याकरणाचे कर्ते आचार्य पूज्यपाद किंवा देवनन्दि हेच होत याविषयीं वाङ्मयांत अनेक महत्त्वाचे उल्लेख आहेत.

श्रवण बेलगोळ शिलालेख नं. ४७, ५०, ५५; आदिपुराणे प्रथम पर्व; पार्श्वनाथचरितम् ; हरिवंशपुराणे; ज्ञानार्णवे सुभचन्द्रः यांतील उतारे अनुवादक रा. शहा यांनीं आपल्या प्रस्तावनेंत दिले आहेत, त्यावरून सिद्ध होते. वैदिक धर्मानुयायी पतञ्जलीला जें स्थान व्याकरण शास्त्रांत देतात तसेंच स्थान पूज्यपादाचार्यांना जैनधर्मानुयायी देतात. पतञ्जली संबंधीं म्हटलें आहे.

योगेन चित्तस्य पदेन वाचां मलं शरीरस्य च वैद्यकेन ।
योऽपाकरोत्तं प्रवरं मुनीनां पतञ्जलिं प्राञ्जलिरानतोऽस्मि ॥

त्याप्रमाणें पतञ्जलीनें योगशास्त्र, व्याकरणशास्त्र आणि वैद्यक यांवर ग्रंथ लिहिले, त्याप्रमाणें पूज्यपादाचार्यांनीही वैद्यक, व्याकरणशास्त्र आणि आध्यात्मिक तत्त्वज्ञान यांवर ग्रन्थ लिहिले. पूज्यपादाचार्यांचा व्याकरण-शास्त्रावरील ग्रंथ म्हणजेच आज उपलब्ध असलेलें जैनेन्द्रव्याकरण होय.

पूज्यपादाचार्यांचा दुसरा उपलब्ध आणि प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे उमास्वातीच्या तत्त्वार्थाधिगमसूत्रावरील "**सर्वार्थसिद्धि**" नांवाची विस्तृत टीका हा होय ही टीका तत्त्वार्थसूत्रावरील बहुधा सर्वांत प्राचीन आणि अत्यंत महत्त्वाची टीका समजली जाते.

पूज्यपादाचार्यांचा तिसरा प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे "**समाधिशतक**" किंवा "**समाधितंत्र**" हा होय. याविषयीं विवरण पुढें येईलच.

याशिवाय शान्त्यष्टक नांवाचें एक लहानसें स्तोत्र पूज्यपादांच्या नांवावर आढळतें "न स्नेहाच्छरणं प्रयान्ति भगवन्" असा या स्तोत्राचा आरंभ असून या स्तोत्राच्या प्रभावानें आचार्यांनीं आपली गेलेली दृष्टि परत मिळविली असा उल्लेख वर आलाच आहे.

श्रवण बेलगोळ येथील ४० नंबरच्या शिलालेखांत खालील श्लोक आढळतो.

**जैनेन्द्रं निजशब्दभोगमतुलं सर्वार्थसिद्धिः परा**
**सिद्धान्ते निपुणत्व मुद्‌घकवितां जैनाभिषेकः स्वकः ।**
**छन्दः सूक्ष्मधियं समाधिशतकं स्वास्थ्यं यदीयं विदा-**
**माख्यातीह स पूज्यपादमुनिपः पूज्यो मुनीनां गणैः ॥१॥**

या श्लोकांत जैनेन्द्रव्याकरण, सर्वार्थसिद्धि व समाधिशतक यांखेरीज "जैनाभिषेक" नांवाचें उच्च कोटीचें काव्य, बुद्धीचा सूक्ष्मता दर्शविणारें "छन्दःशास्त्र" या दोन अद्यापि अनुपलब्ध अशा ग्रंथांचा उल्लेख आहे.

**लक्ष्मीधराचार्यांनीं** आपल्या एकान्तखण्डन नांवाच्या ग्रंथांत पूज्यपादाचार्योना "षड्दर्शनरहस्यसंवेदनसंपादितनिःसीमपाण्डित्य-मण्डिताः" असें विशेषण दिलें आहे; त्यावरून पूज्यपादाचार्यांचें सहाही शास्त्रांत पांडित्य दिसून येतें. त्यापुढेंच पूज्यपादांविषयींचा आणखी एक विशेष सांगितला आहे; तो हा कीं 'एकान्त' खण्डनासाठीं आचार्य 'विरुद्ध' या हेत्वाभासाचा प्रामुख्यानें उपयोग करितात. याच्या पुष्ट्यर्थ पुढील श्लोक 'तदुक्तं' म्हणून दिला आहे.

असिद्धं सिद्धसेनस्य विरुद्धं देवनन्दिनः ॥
द्वयं समन्तभद्रस्य सर्वथैकान्तसाधनम् ॥

याच प्रसिद्धीला अनन्तवीर्यांनीं आपल्या सिद्धिविनिश्चयटींकेंत, तसेंच वादिराजानें आपल्या न्यायविनिश्चयविवरणांत

असिद्धः सिद्धसेनस्य विरुद्धो देवनन्दिनः ॥
द्वेधा समन्तभद्रस्य हेतुरेकान्तसाधने ॥

या श्लोकानें पुष्टि दिली आहे. यावरून असें दिसतें कीं, ज्याप्रमाणें सिद्धसेन आणि समंतभद्र या प्रथितयश नैयायिकांप्रमाणें पूज्यपादाचार्योनीं न्यायशास्त्रांत स्वतंत्र ग्रंथरचना केली असावी. पण आपल्या दुर्भाग्यामुळें तसा स्वतंत्र ग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेला नाहीं. कदाचित् वरील उल्लेख प्रतिपक्षखंडनामध्यें ' विरुद्ध ' हेत्वाभासाचा उपयोग आचार्यांनीं वारंवार केल्यामुळेंही प्रचारांत येणें संभवनीय आहे.

पूज्यपादाचार्यांचा वैद्यकावरील ग्रंथकार म्हणून बरीच प्रसिद्धी आहे. त्यांनीं चिकित्सा व शालाक्य या अष्टांग आयुर्वेदाच्या शास्त्रांवर कदाचित् सर्व शास्त्रांवर मिळून एक ग्रंथाची रचना केली होती.

' जैनेन्द्रन्यास ' (व्याकरण) पाणिनीय व्याकरणावरील ' शब्दावतार न्यास ', ' वैद्यशास्त्र ' आणि ' तत्त्वार्थटीका या पूज्यपादाचार्यांच्या चार ग्रंथांचा शिलालेखांत उल्लेख आहे त्यावरूनही आचार्यांनीं वैद्यकशास्त्रावर ग्रंथ लिहिल्याचें स्पष्ट दिसून येतें. वृत्तविलास नामक एका कानडी कवीनेंही ' धर्मपरीक्षा ' नामक कानडी ग्रंथांतही यंत्रमंत्रादि विषयक शास्त्रांचा कर्ता म्हणून पूज्यपादांचा उल्लेख केला आहे. याशिवाय

'इष्टोपदेश' किंवा 'सिद्धभक्ति' वगैरे काही भक्त्यन्त प्रकरण ग्रंथही आचार्यांनी लिहिले असावेत. प्रभाचंद्राच्या आपल्या सिद्धभक्तिटीकेंतला संस्कृताः सर्वाभक्तयः पूज्यपादस्वामिकृताः प्राकृतास्तु कुन्दकुन्दाचार्यकृताः हा उतारा वरील अनुमानास बळकटी आणणारा आहे.

## समाधिशतक कीं समाधितंत्र ?

प्रस्तुत ग्रंथाचें नांव 'समाधिशतक' कीं 'समाधितंत्र' हा वाद अगदीं अलीकडेच डोकावूं पहात आहे. त्याचा विचार करणें अवश्य आहे पं० जुगलकिशोर मुख्तार यांचे मतें प्रस्तुत पुस्तकाचें नांव 'समाधितंत्र' असें आहे. कारण १९३८ जूनच्या 'श्रीजैनसिद्धांत-भास्कर'च्या अंकांत त्यांनीं या विषयावर जो लेख लिहिला आहे त्याचें शीर्षक "श्रीपूज्यपाद और उनका 'समाधितंत्र'" असें आहे. या 'समाधितंत्र' नांवास पुष्टि देणारें प्रमाण म्हणजे या सटिक ग्रंथांतील १०५ व्या श्लोकांत 'समाधितंत्रम्' असा उल्लेख हें होय. याशिवाय दुसरें प्रमाण नाहीं. माझ्यामतें हा श्लोक पूज्यपादांच्या मूळ ग्रंथांतील नसून बहुधा टीकाकारांचा आहे. या उलट 'समाधिशतक' या नांवास पुष्टि देणारीं प्रमाणें अधिक व जास्त महात्वाचीं आहेत. श्रवणबेलगोळ येथील नंबर ४० च्या शिलालेखांतील ११ व्या श्लोकावरून पूज्यपादांच्या ग्रंथाचें नांव 'समाधिशतक' असेंच ज्ञानार्णवकर्ते शुभचंद्र कवीला सन ११६३ मध्यें माहीत होतें असें स्पष्ट दिसतें. समाधिशतक या नांवाबरोबर 'जैनेन्द्र', 'सर्वार्थसिद्धि', 'जैनाभिषेक', 'छन्दः (शास्त्र)' असे ग्रंथांचे नामतः उल्लेख असल्यामुळें समाधिशतक हेंच नांव योग्य असावेंसें आम्हांस वाटतें. प्रस्तुत ग्रंथांत जी प्रभाचंद्राची टीका छापली आहे तिच्या मङ्गल श्लोकांतील चौथ्या चरणांत

वक्ष्ये समाधिशतकं प्रणिपत्य वीरम् ॥

' समाधिशतक ' असाच उल्लेख आहे. तेव्हां आमच्या मतें ग्रंथाचें नांव समाधिशतक असेंच असलें पाहिजे आणि या ग्रंथाची श्लोकसंख्या १०० किंवा फारतर १०१ अशीच असली पाहिजे.

## समाधिशतकाची श्लोकसंख्या.

तथापि ' शतक ' किंवा ' तंत्र ' या वादांत न शिरतां आपण स्वतंत्रपणें ग्रंथस्वरूपाचें परीक्षण केलें तर असें दिसून येईल कीं आजकाल प्रचलित पाठांत कांहीं प्रक्षिप्त भाग असावा. हा भाग कोणता असेल? प्रचलित पाठांत पहिला श्लोक अनुष्टुभ् वृत्तांत असून दुसरा श्लोक उपेन्द्रवज्रा आणि तिसरा श्लोक वंशस्थ वृत्तांत आहे. चौथ्यापासून श्लोक १०४ पर्यंतचे श्लोक पुन्हां अनुष्टुभ् वृत्तांत असून १०५ वा श्लोक वसंततिलका वृत्तांत आहे. मला असें खात्रीनें वाटतें कीं या ग्रंथांतील दुसरा व तिसरा हे दोन्ही श्लोक प्रक्षिप्त असावेत. एक तर अनुष्टुभ् वृत्तानें ग्रंथाला आरंभ करणारा व बहुतक पुढील सर्व ग्रंथ त्याच वृत्तांत लिहिणारा ग्रंथकार मध्येंच उपेन्द्रवज्रा व वंशस्थ हीं वृत्तें योजून प्रक्रमभंग करणार नाही. ग्रंथाच्या अंतीं मात्र निराळें वृत्त योजून ग्रंथकार ग्रंथसमाप्ति करील, पण मध्येंच, विशेषतः आरंभानंतर लगेच दुसरें वृत्त योजणार नाहीं. दुसरा व तिसरा हे श्लोक प्रभाचंद्राच्या मंगलाचरणाचे व प्रस्तावनेचे असावेत. ग्रंथकारानें ग्रंथाचा आरंभ

येनात्माबुध्यतात्मैव परत्वेनैव चापरम् ।
अक्षयानन्तबोधाय तस्मै सिद्धात्मने नमः ॥

अशा उच्चकोटिक तत्त्वसिद्धांतानें केला आहे, व त्यानेंच मंगला-चरणाचेंही कार्य साधलें आहे; पण पुढील श्लोकांतील वृत्तप्रक्रमभङ्ग बाजूस ठेविला तरीही, आणि धर्ममतांचा समन्वय करण्याचा प्रयत्न कितीही महत्त्वाचा वाटला तरी, पहिल्या श्लोकांतील उच्च भूमिका कमी पडते हें नाकबूल करिता येणार नाहीं. तिसऱ्या श्लोकांत निर्दिष्ट केलेलें ग्रंथाचें प्रयोजनही अप्रस्तुत स्थलींच आहे, आणि पहिल्या श्लोकांतील "अक्षयानन्तबोधाय तस्मै सिद्धात्मने नमः" या चरणानंतर पुनरुक्त आणि अनवश्यक आहे वर निर्दिष्ट केलेल्या कारणांमुळें प्रचलित पाठांतील दुसरा व तिसरा हे दोन्ही श्लोक प्रक्षिप्त आहेत.

पूज्यपादांच्या समाधिशतकाचा व ग्रंथांतील उद्दिष्ट विषयाचा उपसंहार आणि ग्रंथ समाप्ति

**अदुःख भावितं ज्ञानं क्षीयते दुःखसंनिधौ ।**
**तस्माद्यथाबलं दुःखैरात्मानं भावयेन्मुनिः ॥ १०२ ॥**

या श्लोकानें होते. प्रचलित पाठांत सांपडणाऱ्या अनुष्टुभ् वृत्तांतील शेवटच्या १०३ व १०४ या दोन श्लोकांचा प्रतिपाद्य विषयांशीं व पूर्व श्लोकांशीं कांहींच संबंध दिसत नाहीं. येवढेंच नव्हे, तर संपूर्ण झालेलें प्रतिपादन लांबविण्यांत समाप्तपुनरात्तत्व नांवाचा दोषही येण्याचा संभव आहे. तेव्हां प्रचलित पाठांतील २, ३ १०३ व १०४ हे श्लोक खात्रीनें प्रक्षिप्त असावेत व १०५ वा श्लोक बहुधा प्रक्षिप्त असावा असें आमचें अनुमान आहे.

पण जर हे श्लोक प्रक्षिप्त आहेत तर यांवर प्रभाचंद्रानें टीका कशी लिहिली असा प्रश्न कोणी उपस्थित करील तर त्यावर आमचें उत्तर असें आहे कीं, पूज्यपादांचा काल आणि टीकाकार प्रभाचंद्रांचा काल यामध्यें सुमारें ५।६ शतकांचें अंतर आहे. या अंतरामध्यें कोणीतरी हा प्रक्षिप्त भाग ग्रंथांत घुसडला असावा. आज टीकाविरहित मूल

ग्रंथाच्या हस्तलिखित विश्वसनीय प्रती उपलब्ध नाहींत; हे जे वर ४ किंवा ५ प्रक्षिप्त श्लोक दिले आहेत त्यांपैकीं २ व ३ हे श्लोक टीकाकार प्रभाचंद्रांच्या मंगलाचरणांतील असावेत व त्यांवर मागून कोणीतरी टिप्पणवजा टीका लिहिली असावी; १०५ श्लोक उपसंहारभूत असून त्यावरही बहुधा अशीच कोणीतरी टीका लिहिली असावी, पण १०३ व १०४ हे श्लोक केव्हां, कां व कसे आले असावे हें सांगतां येत नाहीं. असाच प्रकार आप्तमीमांसेच्या आचार्य वसुनन्दि यांनीं लिहिलेल्या देवागमवृत्ति नांवाच्या टीकेंत 'जयति जगति क्लेशावेश' या पद्याच्या बाबतींत झाला आहे. ( जुगलकिशोर-स्वामी समन्तभद्र, पृष्ठ १९७-२०० पहा ).

## समाधि-शतक.

ग्रंथांतील प्रतिपाद्य विषय **परमात्म्याच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञान** करून घेणें हा होय. पूज्यपादांनीं हा विषय आगम, युक्ति आणि अंतःकरणाची एकाग्रता करून त्यायोगें स्वानुभव संपन्न होऊन त्याच्या आधारें स्पष्ट आणि सुलभ रीतीनें प्रतिपादिला आहे. परमात्म्याचें किंवा शुद्धात्म्याचें ज्ञान होण्यासाठीं अशुद्धात्म्याच्या ज्ञानाची आवश्यकता आहे. त्यासाठीं आत्म्याचे बहिरात्मा, अन्तरात्मा आणि परमात्मा असे तीन प्रकार कल्पून त्यांचें स्वरूप समजावून दिलें आहे यांपैकीं परमात्मा उपादेय, साध्य किंवा आराध्य असा आहे; अन्तरात्मा उपायरूप, साध्य किंवा आराधक अशी कल्पना केली आहे; आणि बहिरात्मा हेयरूप किंवा त्याज्य आहे असें ठरविलें आहे. याप्रमाणें तीन आत्मभेदांचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे देहादिकांचे ठिकाणीं आत्मस्वरूपाची जी भ्रांति झालेली असते तिचा पूर्णपणें निरास होऊन, परमनिर्मल अशा परमात्म-स्वरूपाचें ज्ञान होतें. हें ज्ञान झालें म्हणजे रागद्वेषादि चित्तदोषांचा नाश होतो; चित्तविक्षेप नाहींसा होतो आणि शत्रुमित्रांविषयीं मध्यस्थबुद्धि

किंवा उदासीनबुद्धि उत्पन्न होऊन चित्त प्रसन्न होतें. हीच उच्च प्रतीची 'समाधि' होय; पण ही अवस्था प्राप्त होण्यासाठीं जें ज्ञान लागतें त्यासाठीं कायक्लेशादि उपायांची आवश्यकता आहे. कायक्लेशादिकांवांचून सुकुमार उपायांनीं जें ज्ञान प्राप्त होतें तें फार वेळ टिकत नाहीं. म्हणून योग्यांनीं कष्ट सहन करण्याची तयारी केली पाहिजे व आत्मस्वरूपाचें चिंतन केलें पाहिजे.

## समाधिशतक आणि तत्सम ग्रंथ.

आत्मस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाकरितां आत्म्याचे निरनिराळे भेद करून पायरी पायरीनें परमात्मस्वरूपाचें ज्ञान करून देणाऱ्या ग्रंथांपैकीं कालानुक्रमानें छांदोग्य व मांडूक्य हीं दोन उपनिषदें पहिलीं होत. छांदोग्योपनिषदाच्या आठव्या अध्यायांत इन्द्रप्रजापति संवाद आहे. त्यांत प्रथम शरीर म्हणजे जाग्रदवस्थेतील अनुभव ही पहिली पायरी, स्वप्नावस्थेतील अनुभव ही दुसरी पायरी व सुषुप्तावस्थेतील प्रसन्नता ही तिसरी पायरी अशा क्रमानें परमात्म्याचें ज्ञान करून देण्यांत आल्यावर शेवटीं चौथ्या पायरीनें आत्यंतिक परमात्मज्ञान करून देण्यांत आलें आहे. माण्डूक्योपनिषदांत हें ज्ञान चतुष्पाद म्हणजे चार पायऱ्या असलेलें असें म्हटलें आहे. त्या पायऱ्या किंवा पाद म्हणजे जागरितस्थान बहिष्प्रज्ञ, स्वप्नस्थान अन्तःप्रज्ञ, सुषुप्तस्थान चेतोमुख प्राज्ञ व शेवटीं "नान्तःप्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतःप्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम्" अशी 'नेति नेति' स्वरूपाची चौथी पायरी या होत. मांडूक्योपनिषदावर गौडपादाचार्यांनीं एक श्लोकबद्ध टीका लिहिली आहे त्याच "गौडपादीय कारिका" या नावानें प्रसिद्ध आहेत. या कारिका चार प्रकरणांत विभागलेल्या असून त्यांपैकीं चौथें प्रकरण अलातशान्ति (**समाधि**) असें आहे. हें प्रकरण स्वतंत्रच ग्रंथ आहे असें म्हणणारे विद्वान् आहेत. या प्रकरणाची श्लोकसंख्या बरोबर १०० असून त्याचें आणि आपल्या

समाधिशतकाचें पुष्कळ बाबतींत साम्य आहे. हाही ग्रंथ समाधिशतका-प्रमाणें सर्वच अनुष्टुभ् वृत्तांत लिहिलेला असून त्यांत अस्पर्शयोग नांवाच्या समाधीचा उल्लेख वारंवार आलेला आहे. या ग्रंथावर माध्यमिक बौद्धांच्या मताची तीव्र छाप पडलेली दिसते. समाधिशतकांतील विवेचन व त्यांतील विवेचन हीं पुष्कळ जुळणारीं आहेत, पण भिन्नताही कमी नाहीं. शब्दसाम्य, कल्पनासाम्य हींही आढळतात. पण समाधिशतकांत आत्मज्ञानाच्या तीन पायऱ्या तर गौडपादीयकारिकांत चार असा महत्त्वाचा फरक आहे. **अजातिवाद्** दोहोंतही आहे ( अलातशान्ति ४ व समाधिशतक ८८, ८९ ). चित्तविक्षेप होऊं न देतां, समाधि साधावी असेंही दोन्ही ग्रंथांत म्हटलें आहे ( समाधिशतक ३६, ३७; अलातशान्ति ७५-७९ ). समाधि प्राप्त करून घेण्याच्या पायऱ्याही दोन्ही ग्रथांत निर्दिष्ट केल्या आहेत ( समाधिशतक ३५-३७; गौडपादीयकारिका-अद्वैत ४४-४६ ). स्वप्नज्ञानावरून जागरितज्ञानाचें मिथ्यात्व दोन्ही ग्रंथांत प्रदिपादिलें आहे ( गौडपाद, वैतथ्यप्रकरण, अलातशान्ति ३३-४१; समाधिशतक १०१ ) वगैरे. तेव्हां आत्मज्ञानाच्या पायऱ्या वैदिक धर्मांत, बौद्ध धर्मांत ( बौद्ध आत्मा मानीत नाहींत, तरी पण शून्यतारूपी जें परमज्ञान त्याच्या पायऱ्या ' न सत् नासत् न सदसत् न चाप्यनुभयात्मकम् ' अशा चारच आहेत असें त्यांचें मत आहे ), व जैनधर्मांत बऱ्याच अंशीं जुळत्या आहेत यांत शंका नाहीं. प्रत्येक धर्माच्या आगमग्रंथांत भेद असल्यामुळें विवेचनाची पद्धति जरी आपाततः निराळी भासली तरी **प्रमेयें एकच** आहेत अशी जाणीव होण्यास फारशी अडचण पडत नाहीं.

परमात्म्याचें तीन प्रकारांनीं ज्ञान करून घ्यावें असें वर्णन जैनांच्या ग्रंथांतही आढळतें. योगीन्दुदेव किंवा योगीन्द्रदेव यांच्या परमात्मप्रकाश नांवाच्या अपभ्रंशभाषेंत लिहिलेल्या ग्रंथांत १ मूढ

२ विचक्षण व ३ पर किंवा ब्रह्म अशा त्या तीन पायऱ्या आहेत. समाधिशतकांतही, अविद्वान् मूढ, मूढात्मा, अबुद्धि बाल, जड, मोही अशा शब्दांनीं बहिरात्म्याचें वर्णन केलें आहे. परमात्म प्रकाशांतील विचक्षण आत्म्याबद्दल समाधिशतकांत तत्त्वज्ञानीं, बुध, आत्मविद्, अवबुद्ध, प्रबुद्धात्मा, ज्ञातात्मा असे शब्द उपयोजिले आहेत. परमात्म्याचें वर्णन तर उभयत्र सारखेंच आहे.

उपनिषद् ग्रंथ सोडून दिले तर **परमात्मस्वरूपाचें** तीन पायऱ्यांनीं वर्णन **पूज्यपादांनींच प्रथम** केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. योगीन्दु व गौडपाद हे दोघेही कालानुक्रमें नंतर येतात. जैनांचे आगमोपजीवी जे सिद्धान्तग्रन्थ आहेत त्यांत जीवस्वरूप व्यवहारनय व निश्चयनय या दोन प्रकारांनीं केलेलें आढळतें; पण हेय ( त्याज्य ), उपाय ( साधन ) आणि उपेय ( साध्य ) या तीन प्रकारांनीं **आत्मस्वरूपाचें विवेचन समाधिशतकांत जितक्या सुंदर** रीतीनें केलें आहे तितकें इतरत्र आढळणार नाहीं यांतच **समाधिशतकाचें महत्त्व** आहे तेव्हां असा सुंदर व सटीक ग्रंथ मराठी भाषेंत आणल्या-बद्दल **जैन** समाजानें व **जैनेतर** समाजानेंही रा. रा. **रावजी नेमचंद शहा** वकील यांचे फार आभारी असलें पाहिजे. जैन समाजानें आपली आवड या ग्रंथाच्या पुनरावृत्तीचा योग. जरा उशीरानें कां होईना, रा. शहा यांस आणून देऊन दाखविलीच आहे. पण या पुनरावृत्तीच्या प्रसंगानें रा. शहांनीं मला ही प्रस्तावना लिहावयास लावून पूज्यपादा-चार्यांच्या ग्रंथाच्या अभ्यासाचा लाभ मला घडवून आणला याबद्दल मीही त्यांचा फार आभारी आहें.

वाडिया कॉलेज, पुणें.
१ - १० - १९३८.

**परशुराम लक्ष्मण वैद्य.**

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना व आत्मनिवेदन.

आज सव्वादोन तपानंतर या अनुवादाच्या द्वितीयावृत्तीचा योग महामुनि **श्री० १०८ पायसागर महाराज** यांच्या कृपेनें येत आहे याबद्दल मी त्यांना प्रथम सविनय अभिवादन करीत आहे. **जैनसाहित्यप्रकाशनां**नच खरीखुरी धर्मप्रभावना आहे हें महाराजांनीं जाणून त्यासंबंधीं चालविलेले प्रयत्न स्तुत्य व अनुकरणीय नाहींत असें कोण म्हणेल? श्रीजिनवाणी प्रसारक चारित्र चक्रवर्ति श्रीमदाचार्य शांतिसागर दिगंबर जैन शासन मालेच्या चालकांचा–विशेषत: बालकवि श्री. जि. दा. उपाध्याय व पं० कालचंद्रजी यांचा मी–अत्यंत ऋणी आहे. त्यांच्याच विशेष परिश्रमामुळें व आगमभक्तीमुळें हें प्रकाशनकार्य अत्यंत उत्कृष्ट रितीनें पार पडलें आहे हें येथें नमूद करणें जरूर वाटतें.

जैनाचार्यांचीं आधुनिक पद्धतीनें संशोधनात्मक चरित्रें लिहिणें जरूर आहे. त्या दृष्टीनें प्रस्तुत लेखकानें जैनांतील श्रेष्ठ व नामांकित अशा पांच आचार्यांचीं चरित्रें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत.

श्रीपूज्यपाद आचार्यांची, त्यांच्या अद्वितीय ग्रंथांची, त्यांच्या अपार विद्वत्तेची व त्यांच्या पावित्र्यपूर्ण चारित्र्याची प्रशंसा भगवान् **जिनसेनाचार्यांनीं आदिपुराणांत, वादिराजानें पार्श्वनाथ** चरित्रांत, **शुभचंद्र भट्टारकांनीं** पांडवपुराणांत, **पद्मप्रभांनीं** नियमसार टीकेंत, **धनंजयांनीं** नाममालेंत, **गुणनन्दींनीं** जैनेंद्रप्रक्रियेमध्यें व **शुभचंद्रांनीं** ज्ञानार्णवांत केली असून त्यांत त्यांना त्यांनीं

भक्तिपुरस्सर स्तुतिसुमनें वाहिलीं आहेत. नमुन्याकरितां त्यांतील कांहीं सूक्ति येथें उध्दृत केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं.

**कवीनां तीर्थकृद्देवः किंतरां तत्र वर्ण्यते ।**
**विदुषां वाङ्मलध्वंसि तीर्थं यस्य वचोमयम् ॥ ५२ ॥**

कविरत्न जिनसेन आपल्या आदिपुराणांत म्हणतात:— "देवनंदि-अर्थात् यांचें संक्षिप्त रूप किंबहुना लाडकें नांव 'देव' हे कविजनांचे तीर्थंकर होत. यांच्याविषयीं मी काय अधिक सांगूं शकणार ? यांची वाणी उर्फ वाङ्मय हें शब्दशास्त्ररूपी व्याकरण तीर्थ असून तें विद्वज्जनांच्या वचनमलाला नाहींसें करणारें आहे."

**अचिन्त्य महिमा देवः सोऽभिवंद्यो हितैषिणा ।**
**शब्दाश्च येन सिद्ध्यन्ति साधुत्वं प्रतिलम्भिताः ॥ १८ ॥**

वादिराजसूरि यांनीं पार्श्वनाथचरित्रांत असें म्हटलें आहे:— ज्यांच्या सहाय्यानें-ज्यांच्या व्याकरणशास्त्राच्या मदतीनें शब्द उत्कृष्ट रितीनें सिद्ध होतात ते देवनन्दी अचिन्त्य-महिमायुक्त देव आहेत; आपल्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या लोकांनीं नेहमीं वंदन करण्यास योग्य असेच ते आहेत !

**पूज्यपादः सदा पूज्यपादः पूज्यैः पुनातु माम् ।**
**व्याकरणार्णवो येन तीर्णो विस्तीर्ण सद्गुणः ॥**

शुभचंद्र भट्टारक पांडवपुराणांत म्हणतात:— "पूज्यपाद हे पूज्यांनासुद्धां पूज्यपाद-वंदनीय-आहेत; ते मला पावन करोत ! ते अनंत सद्गुणांचे धारक असून, व्याकरणशास्त्ररूपी समुद्र त्यांनीं ओलांडिला आहे."

पद्मप्रभ यांनीं नियमसारटीकेंत 'शब्दाब्धीन्दुं पूज्यपादं च वन्दे' अर्थात् शब्दसागराचे चंद्र अशा पूज्यपादांना मी वंदन करतों असें म्हणून त्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. आमच्यामतें ते शब्दसृष्टीचे तीर्थंकर आहेत.

**प्रमाणमकलंकस्य पूज्यपादस्य लक्षणम् ।**
**द्विसंधानकवेः काव्यं रत्नत्रयम पश्चिमम् ॥**

धनंजय कवींनीं नाममालेंत पूज्यपादांच्या लक्षण अर्थात् व्याकरण-शास्त्राला अपूर्व रत्न म्हणून संबोधिलें आहे.

**नमः श्रीपूज्यपादाय लक्षणं यदुपक्रमम् ।**
**यदेवात्र तदन्यत्र यन्नात्रास्ति न तत्कचित ॥**

गुणनन्दि जैनेंद्रप्रक्रियेंत यांच्यासंबंधानें असा जयजयकार करतात कीं, यांच्या व्याकरणांत ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या दुसऱ्या व्याकरणग्रंथांतूनहि सांपडतात; पण ज्या येथें नाहींत त्या इतरत्र कोठेंही उपलब्ध होत नाहींत. अशाप्रकारें यांचें 'जैनेंद्र' व्याकरण सर्वांगपरिपूर्ण व सर्वांगसुंदर असल्याची घोषणा केली आहे.

ज्ञानार्णवांत श्री शुभचंद्राचार्य म्हणतात:—

**अपाकुर्वन्ति यद्वाचः कायवाक् चित्तसंभवम् ।**
**कलंकमंगिनां सोऽयं देवनन्दी नमस्यते ॥**

देवनन्दीची वाणी प्राणिमात्रांचें शरीर, वाणी व मन यासंबंधींचे दोष दूर करणारी आहे. यांत ज्ञानार्णवकारांनीं पूज्यपादाचार्यांच्या अनेक ग्रंथांचा मोठ्या मार्मिक रीतीनें नामनिर्देश एकत्र केला आहे वाग्दोषाला दूर करणारें आपलें 'जैनेंद्र' व्याकरण तर सुप्रसिद्धच

आहे. वर जिनसेनांनींही ' विदुषांवाङ्मलध्वंसि ' हें विशेषण देऊन त्याचा विद्वानांनासुद्धां प्रमाणभूत ग्रंथ म्हणूनच उल्लेख केला आहे. आतां–चित्त–मन:संबंधी दोषांना नाहींसा करणारा आपला प्रस्तुत ग्रंथराज **समाधि–शतक** हा होय.

याचा विशेष परिचय पुणें वाडिया कॉलेजचे प्रथितयश प्राध्यापक,–वाग्भट–डॉक्टरमहाशय श्री. प. ल. वैद्य एम्. ए. यांनीं पुढें आपल्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेंत तौलनिक दृष्ट्या करून या ग्रंथरत्नाचें वैशिष्ठ्य सर्वांना पटवून दिलें आहे. पं० जुगलकिशोर यांनींही हिंदी भाषेंत याच ग्रंथरत्नाचा अनुवाद करून आपल्या चरित्रनायकांचें गुणगान आपल्या संशोधनपूर्वक विस्तृत प्रस्तावनेंत केलें आहे. हें चरित्र लिहितांना त्यांच्या लेखाचा–किंबहुना एकत्र केलेल्या ऐतिहासिक माहितीचा व शिलालेखांचा फारच उपयोग मला झाला आहे. याबद्दल मी डॉ० **वैद्य** व पं० **जुगलकिशोर** या दोघांचाहि आजन्म ऋणीच राहूं इच्छितो.

आतां आचार्यांचा कायदोष दूर करणारा वैद्यक शास्त्रावरील ग्रंथ राहिला. श्रवणबेळगोळ येथील एका शिलालेखांत ' श्रीपूज्यपाद-मुनिरप्रतिमौषधर्द्धिर्जीयात् ' म्हणजे त्यांना ' अद्वितीय औषध-ऋद्धीचे धारकमुनि ' असें संबोधिलें आहे. उग्रादित्याचार्य यांनीं ' कल्याण-कारक, नांवचा संस्कृत भाषेंत ' वैद्यक ' विषयावर उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथांत उग्रादित्यजींनीं ज्या सात आचार्यांचा उल्लेख केला आहे त्यांतले **पूज्यपाद** हे पहिले असून ठिकठिकाणीं आधारभूत ( Authority ) म्हणून त्यांनीं त्यांचीं वैद्यक विषयावरील मतेंहि उध्दृत केलीं आहेत. ' वैद्यसार ' ग्रंथ जैनसिद्धांतभास्कर मधून (१९३८) प्रसिद्ध होत आहे. त्यांत ' विषमज्वरा ' ( Typhoid ) वर

चंद्रकांतरस नामक औषध कसें तयार करावें हें सांगितलें आहे. शिवाय, आज मितीस अनेक 'असाध्य' म्हणून मानल्या गेलेल्या रोगांवर औषधि योजना दिलेली असून तें औषध-मात्रा-रस वगैरे कसकसें तयार करावेंत हें सांगितलें आहे; त्यांतच शेवटीं पूज्यपादेन 'कथितः' 'निर्मितः' 'भाषितः' असें अनेक वेळां म्हटलें आहे. डॉ० प. ल. वैद्य यांनीं आपले चरित्रनायक पूज्यपादांचा वैद्यशास्त्रावरील ग्रंथ अनुपलब्ध आहे असें म्हटलें आहे. पं० नाथूराम प्रेमीजींची मजल याहीपुढें गेली आहे. ते म्हणतात कीं, जैनेंद्र व्याकरणाचे कर्ते पूज्यपाद यांनीं वैद्यशास्त्रावर मुळीं ग्रंथच लिहिला नसून, 'वैद्यक' शास्त्रावरील पूज्यपाद यांच्या नांवावर असलेला ग्रंथ चरित्रनायक पूज्यपादाचार्यांचा नसून दुसऱ्या कोणा तरी पूज्यपादाचा तो ग्रंथ आहे. यावरून संशोधकांत मतभेद दिसतो हें उघड आहे. पण यापुढें दिलेल्या पुराव्यांवरून पंडित नाथूरामजींचें मत बरोबर आहे असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, शिवमोगा जिल्ह्यांतील नगर तालुक्यांत जैनांची देवता 'पद्मावती' इचें मंदिर असून त्यांतील एका दगडावर कोरलेला ४६ नंबरचा जो शिलालेख आहे त्यांत जैनेंद्रकर्ते पूज्यपाद यांच्याबद्दल असें म्हटलें आहे:—

> न्यासं जैनेंद्रसंज्ञं सकलबुधनतं पाणिनीयस्य भूयो-
> न्यासं शब्दावतारं मनुजततिहितं वैद्यशास्त्रं च कृत्वा
> यस्तत्वार्थस्य टीकां व्यरचयदिह तां भात्यसौ पूज्यपाद-
> स्वामी भूपालवंद्यः स्वपरहितवचः पूर्णदृग्बोधवृत्तः ॥

यांत पूज्यपादांच्या चार ग्रंथांचीं नांवें क्रमशः दिलीं आहेत. पहिला ग्रंथ जैनेंद्र नांवाचें न्यास अर्थात् व्याकरण; याची सर्व विद्वानांनीं

स्तुति केली आहे असें म्हटलें आहे. दुसरा ग्रंथ पाणिनीच्या व्याकरणावर लिहिलेलें 'शब्दावतार' नांवाचें न्यास होय. तिसरा मानवसमाजाच्या कल्याणार्थ रचिलेलें 'वैद्यशास्त्र'; व चौथी तत्त्वार्थ-सूत्रावरील टीका '**सर्वार्थसिद्धि**' ही टीका पहिले तीन ग्रंथ लिहिल्यानंतर रचिली असें स्पष्टपणें शिलालेखांत म्हटलें आहे. शेवटच्या चरणांत चरित्रनायक हे भूपाल-राजांना-वंद्य असें म्हटलें आहे. यावरून गंगवंशांतील राजे दुर्विनीत यांचे पूज्यपाद हे शिक्षा गुरु ( Preceptor ) होते हेंहि स्पष्ट होतें. आमचे सन्माननीय मित्र सुप्रसिद्ध इतिहासकार श्री. पाटील यांनीं '**दक्षिण भारत**' ग्रंथांत पान ९० व ९१ यांवर गंगराज घराण्यांतील दुर्विनीत ( इ. स. ४७८ ते इ. स. ५११ * ) हा पूज्यपादाचार्यांचा शिष्य होता. या राजानें गद्यग्रंथ लिहिला आहे.' असें जें म्हटलें आहे त्यावरून वरील विधानास पुष्टि मिळून चरित्रनायकाचा कालनिर्णयही ठरतो. "इसवी सनाच्या १२ व्या शतकाच्या मध्यापर्यंत प्राय: सर्वच **वाङ्मय व वाङ्मयनिर्मिते जैनच** आहेत. यामुळेंच या काळांतील वाङ्मयास **जैनवाङ्मय** व जैनकाल ( Jain Period ) असें सार्थ नांव मिळालें आहे." या रा. पाटलांच्या सत्योक्तिपूर्ण विधानावरून पूज्यपादांचा काल म्हणजे जैनांच्या अत्यंत भरभराटीचा व उत्कर्षाचा मध्यान्ह काल होय व प्रत्यक्ष राजघराण्याचे गुरु होण्याचा बहुमान आपल्या चरित्रनायकांना मिळाला होता या गोष्टी जैनधर्म, जैनतत्त्वज्ञान व जैनसंस्कृति यांच्या सर्वश्रेष्ठत्वाच्या द्योतक ठरत नाहींत काय? याशिवाय वरील श्लोकांत पूज्यपादप्रणीत ग्रंथ स्वपरहितकारी असून

---

* इ. स. ५२२ पर्यंत यानें राज्य केलें असें इतरत्र सांपडतें.

—अनुवादक.

दर्शन-ज्ञान-चारित्र यांनीं परिपूर्ण आहेत असाहि गौरवपूर्वक उल्लेख आढळतो.

याच अवतरणावरून पूज्यपादांचा " शब्दावतार " या नांवाचा एक अनुपलब्ध ग्रंथ असल्याचाहि शोध लागतो. विक्रमसंवताच्या १२ व्या शतकांत कवि वृत्तविलास होऊन गेले त्यांनींही पाणिनीच्या व्याकरणावर पूज्यपादांनीं एक टीका ग्रंथ लिहिल्याचा जो उल्लेख केला आहे त्यावरून ती टीका म्हणजे 'शब्दावतार' नांवाचा न्यास-ग्रंथच होय असें स्पष्ट होतें. याशिवाय त्यांतच 'यंत्रमंत्रादि शास्त्रोक्त-करमं' 'विश्वविद्याभरणं' अशीं महत्त्वपूर्ण विशेषणें दिलीं आहेत. यावरून यंत्र मंत्रादि विषयांवर शास्त्र रचिल्याचेंहि स्पष्टपणें सूचित होतें. 'विश्वविद्याभूषण' यावरून त्यांना विद्वज्जन व नामांकित साहित्यिक किती सन्मानपूर्वक संबोधित होते हेंहि दिसतें. याशिवाय उग्रादित्यांनीं 'शालाक्यं पूज्यपादप्रकटहितमधिकं' असें म्हटलें आहे. यावरून पूज्यपादांच्या एका चिकित्साग्रंथाच्या नांवाचाहि बोध होतो. या 'शालाक्य' ग्रंथांत कर्ण, नेत्र, नासिका, मुख व शिर्षरोग यांची चिकित्सा केली आहे. या सर्व आधारांवरून पूज्यपादांचा वैद्य शास्त्रावर मुळीं ग्रंथच नाहीं हें पं० नाथूरामजींचें मत चुकीचें आहे हेंच ठरतें. येथें आणखी एक महत्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें जरूर दिसतें. चित्रकवि सोम यांनीं कन्नड भाषेंत 'कल्याणकारक' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ 'पूज्यपादमुनिगळु पेल्द कल्याणकारक वाहडसिद्धांतकादिष्टं' पूज्यपादाचार्यांच्या ग्रंथाधारेंच लिहिल्याचें अवतरणांतील उताऱ्यावरून स्पष्ट होतें. सोमदेवांचा वरील ग्रंथ आरा येथें जैन सिद्धांतभवनांत आहे. या सर्व माहितीचा निष्कर्ष असाच निघतो कीं, जैनांनीं काव्य वगैरे इतर सर्व विषयांप्रमाणेंच वैद्य शास्त्रावरहि अत्युत्कृष्ट ग्रंथ लिहिलेले आहेत.

वरील ग्रंथांशिवाय पूज्यपादांनीं कोणकोणते ग्रंथ रचिले हें सांगणें कठीण आहे. तथापि **इष्टोपदेश** व **सिद्धभक्ति** यांसारखे प्रकरण ग्रंथहि लिहिले असून ते प्रसिद्धहि आहेत. सिद्धभक्ति शिवाय श्रुतभक्ति, चारित्र भक्ति, योगभक्ति, आचार्य भक्ति, निर्वाणभक्ति, व नंदीश्वरभक्ति, नांवाचीं संकृत प्रकरणेंहि पूज्यपादांच्या नांवानेंच प्रसिद्ध आहेत. क्रियाकलापचे टीकाकार प्रभाचंद्र यांनीं आपल्या सिद्धभक्तिच्या टीकेंत 'संस्कृताः सर्वे भक्तयः पूज्यपादस्वामिकृताः' असें स्पष्ट म्हटलें आहे. 'एकांतखंडन' ग्रंथांत लक्ष्मीधर यांनीं पूज्यपादस्वामींना 'षड्दर्शनरहस्य-संवेदन-सम्पादित-निरसीम पांडित्य-मण्डिताः' हें विशेषण देऊन गौरविलें आहे. यावरून पूज्यपाद हे फार मोठे तार्किक विद्वान् होते, येवढेच नव्हे तर न्यायशास्त्रावरहि त्यांनीं स्वतंत्र ग्रंथरचना केली असली पाहिजे व त्या ग्रंथांत आचार्यांनीं नित्यादि एकांत वादाचें खंडन केलें असलें पाहिजे हें सिद्ध होतें.

**'सर्व व्याकरणे विपश्चिदधिपः श्रीपूज्यपादः स्वयम् ।'**

**'जैनेन्द्रे पूज्यपादः'** । (श्रवण बेळगोळ शि. लेख ४५, ५०, ५५

पहिल्या वाक्यांत मेघचंद्र त्रैविद्य देव यांना व्याकरण विषयातील खुद्द 'पूज्यपाद' म्हटलें आहे. यावरून पूज्यपाद हे 'अखिल व्याकरण पंडित शिरोमणी' होते हेंच स्पष्ट होतें ना ? दुसऱ्या वाक्यांत जिनचंद्राचार्यांचें जैनेंद्र-व्याकरणाचें ज्ञान स्वतः पूज्यपादाइतकें होतें असें म्हटलें आहे जैनेंद्र व्याकरणातील सूत्रांच्या लघुत्वामुळें भारतांतील आठ प्रमुख शाब्दिकामध्यें पूज्यपाद यांचीहि गणना आहे.

या विवेचनावरून पूज्यपादांची चतुर्मुखी प्रतिभा स्पष्ट ज्ञात होत असून, त्यांनीं सर्व महत्त्वाच्या विषयांवर ग्रंथरचना केली होती.

ते महान् दार्शनिक, अद्वितीय वैयाकरणी, अपूर्व वैद्य, धुरंधर कवि, फार मोठे तपस्वी, सातिशय योगी व पूज्य महात्मा होते. आणि त्याचमुळें इ. सनाच्या ८।९।१० व्या शतकांतील विद्वान् वाग्भटांनीं व पंप आदि बहुतेक सर्व कर्नाटक कवींनीं त्यांचें श्रद्धापूर्वक स्मरण करून मुक्तकंठानें स्तुतिसुमनें त्यांचें चरणीं वाहिलीं आहेत.

# समाधिशतक.

**समाधिशतक** हा आध्यात्मिक ग्रंथ आचार्यांची शेवटची कृति होय. पूज्यपादांची बाह्य विषयांवरील प्रवृत्ति नष्ट होऊन, अंतर्मुख वृत्ति झाल्यानंतर ते जेव्हां स्थितप्रज्ञ अवस्थेस पोहचले त्यावेळीं याची रचना त्यांनीं केली असली पाहिजे. जैनवाङ्मयांत अध्यात्मविषयांवर शेंकडों ग्रंथ आहेत. सध्यसामग्र्यांमध्ये साठसाठ ग्रंथ हि उपलब्ध आहेत; पण या समाधिशतकाचें वैशिष्ट्य कांहीं औरच आहे. यांत अगदीं मोजक्या शब्दांत सूत्ररूपानें अध्यात्म विषयाचें फार सुंदर प्रतिपादन केलें आहे. प्रतिपादनशैली अत्यंत सरळ, सुंदर, सुबोध, हृदयंगम व प्रभावशाली आहे. यांतील पद्यरचना चारुतासंपन्न व प्रसादादि गुणांनीं युक्त असून, भाषा–सौष्ठव मोहित करणारें व वाखाणण्या जोगें आहे. वाचनास सुरवात केल्यावर ग्रंथ हातांतून संपूर्ण केल्याशिवाय सोडवत नाहीं. पुनः पुनः मननीय व अभ्यासनीय वाटतो. सर्व अध्यात्मवाङ्मयाचें दोहन करून, शास्त्रसमुद्राचें मंथन करून जें नवनीतामृत निघालें तें सर्व या ग्रंथांत पूर्णपणें भरलेलें आहे असें या ग्रंथाचा स्वाद घेतांना वाटतें. यांतील गुणसमुच्चयामुळें वाचकवृंद अगदीं भारून जातो; त्याचें अंतःकरण प्रफुल्लित होऊन ठिकठिकाणीं संसारांत आपलें कोठें चुकतें याचें अचूक व सम्यग्ज्ञान होतें. अज्ञान-रूपी मळ धुवून जातो; व दुःख, संताप, शोक, चिंता वगैरे

विकारांचा आत्म्यावर मुळींच प्रभाव न पडतां तो उच्च वातावरणांत आपल्या समाधीच्याद्वारें वावरत जाऊन अंतरात्मा होऊन परमात्म-पदास पोंहोचतो.

अशा या अनेक प्रकारच्या सूक्तींनीं परिपूर्ण ग्रंथाचें पुनर्मुद्रण ज्या मालेनें व दातारांनीं केलें त्यांचे हार्दिक आभार मानून जैनसिद्धांत भास्करांतील पं० जुगल किशोरच्या विद्वत्ताप्रचूर प्रस्तावनेचा बव्हंशानें अनुवाद करण्याची सुसंधी दिल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करून हें आत्मनिवेदन आम्ही संपवितों.

सोलापूर<br>
ता. २८।१०।१८<br>
श्रीमहावीर निर्वाण<br>
संवत २४४५

रावजी नेमचंद शहा,<br>
वकील.

# समाधिशतक.

समाधिशतक पुस्तकाचे अनुवादक.

रावजी नेमचंद शहा.

— समाधिशतकाचे अनुवादक —

# साहित्यचंद्र श्री. रावजी नेमचंद शहा, वकील, सोलापूर यांचा अल्प परिचय.

[ लेखकः– श्री. नेमचंद न. दोशी, बी. ए., बी. टी. ]

आमच्या चरित्रनायकाचे आजे श्री. कुबेरचंद यांनीं गुजराथेंतील इडर गांवाला रामराम ठोकून महाराष्ट्रांतील सोलापूर जिल्ह्यांतील कुरुल नामक एका छोटेखानी खेड्यांत आपला संसार थाटण्यास पुन्हां आरंभ केला. पिढीजात धंदा सावकारीचा असून देखील गरीबांविषयीं विलक्षण दयार्द्र बुद्धि त्यांच्या अंतःकरणांत नांदत होती. अत्यंत प्रामाणिकपणानें आपला धंदा चालवून त्यांनीं बरीचशी माया संपादन केली.

श्री. रावजी नेमचंद हे कुबेरचंदाचे नातू असून त्यांचा जन्म ता. २ जून १८९० सालीं झाला. या वेळीं त्यांच्या पित्यांना स्वर्गस्थ होऊन दोन महिन्यांचा काळ लोटला होता. या घटनेनंतर त्यांची विधुर माता आपल्या बालकासह सोलापूर येथील आपल्या पित्याच्या घरीं रहावयास गेली. तेथें चरित्रनायकावर त्यांच्या आजीनें व मावशीनें मायेचें पांघरूण घातलें व उत्कृष्ट असें गृहशिक्षण व धर्मशिक्षण दिलें. तेथेंच त्यांचें दुय्यम शिक्षणही झालें.

विद्यार्थी दशेंत अंगच्या कुशाग्रबुद्धिमत्तेनें व अभ्यासुवृत्तीनें त्यांनीं आपल्या गुरुजींचें प्रेम आणि आदर संपादन केला. जिज्ञासु आणि मेहनती विद्यार्थी म्हणून गौरवानें त्यांच्या नांवाचा उल्लेख केला जात

असे. संस्कृत आणि इंग्रजी या विषयांतील नैपुण्याबद्दल त्यांनीं कितीतरी बक्षिसें मिळविलीं. आरंभापासून यांना दोन गोष्टींची अत्यंत चीड होती. त्यापैकीं पहिली विद्वत्तेचें खोटें प्रदर्शन करणें, व दुसरी घोकंपट्टी करणें.

महाराष्ट्र भाषेचे सुप्रसिद्ध दिवंगत कवि रा. परशुरामपंत तात्या गोडबोले यांचे विद्वान् सुपुत्र श्री. रामचंद्रपंत यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं दुय्यम शिक्षण मिळविण्याचें यहांना भाग्य लाभलें. हायस्कूलांतील शैक्षणिक जीवनक्रमांत मराठी साहित्यांत ते जसा प्रामुख्यानें भाग घेत तसेंच वक्तृत्वाच्या चढाओढीच्या सामन्यांत मोठ्या उत्साहानें सामील होत असत. त्यावेळीं सोलापूर आणि धुळें येथील वक्तृत्वाच्या चढाओढींत पहिल्या प्रतीचीं कितीतरी बक्षिसें वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षी पदरांत पाडून घेतलीं ! खणखणीत आवाजांत मुद्देसूद अशीं व्याख्यानें होत असल्यामुळें त्यांचें भाषण सर्वांनाच अतिशय आवडत असे.

सोलापूर येथील सरकारी नार्थकोर्ट हायस्कूल मधून ते १९०७ सालीं उत्तम तऱ्हेनें प्रवेश-परीक्षेंत उत्तीर्ण झाले. एवढ्या अवधींत त्यांनीं गुजराथ व दक्षिण हिंदुस्थानांत प्रवास करून जैनांच्या बहुतेक सर्व प्रसिद्ध व पवित्र स्थळांचें निरीक्षण केलें व तीर्थयात्रा केली. या दौऱ्यानंतर उच्च शिक्षणासाठीं पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजांत आपलें नांव दाखल केलें. तेथें रँ. परांजपे, डॉ. गुणे, प्रो. काळे, प्रो. हरीभाऊ लिमये आणि प्रो. पटवर्धन इत्यादि प्रथितयश प्राध्यापकांच्या सन्निध बसून अध्ययन करण्याचें महद्भाग्य त्यांना लाभलें ! तसेंच त्या वेळच्या महाराष्ट्राच्या राजकीय प्रांगणावर आपल्या ठिकाणच्या अतुल पराक्रमानें तळपणारे

लोकमान्य टिळक, नामदार जी. के. गोखले, काळ पत्राचे संपादक प्रो. परांजपे इत्यादि नरशार्दूल देशभक्तांचीं नेहमीं होणारीं व्याख्यानें ऐकण्याची अत्यंत दुर्मिळ संधि शहांना प्राप्त झाली व या संधीचा त्यांनीं योग्य तो फायदा करून घेतला. वरील राष्ट्रपुरुषांच्या नेतृत्वाखालील त्यांचें शिक्षण म्हणजे त्यांनीं आपल्या पुढील आयुष्यांत उभारलेल्या सामाजिक, राष्ट्रीय आणि साहित्यिक क्षेत्रांतील अनेकविध चळवळीचा पायाच होय !

प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं स्थापन केलेल्या ऐतिहासिक संशोधन मंडळांत त्या संस्थेचे एक सन्मान्य सभासद म्हणून त्यांनीं कांहीं काळ काम केलें आणि या क्षेत्रांत त्यांनीं मोठ्या धडाडीनें पाऊल टाकिलें. तसेंच वादविवादात्मक संस्थामध्यें वादग्रस्त प्रश्नांचा आपल्या अमोघ वाणीनें निकाल लावून प्रागतिक विचारसरणीची छाप उठविण्यास ते केव्हांही चुकत नसत. आपल्या चुकीच्या विचारसरणीपासून विलग होण्यांत त्यांना यत्किंचित् देखील संकोच वाटत नसे. कोणत्याही प्रश्नाची विचारसरणी खोल दृष्टीनें अभ्यासून निरभिमान वृत्तीनें ती हाताळण्याची जणूं यांना खोडच जडली. असें करीत असतांना ते आपल्या प्रयत्नांत यत्किंचित् देखील आळस करीत नसत. चालढकल करणें त्यांना ठाऊकच नव्हतें. कॉलेजांतील त्यांच्या या काळांत त्यांनीं कितीतरी मोठमोठ्या देशभक्त पुढाऱ्यांच्या व समाजसुधारकांच्या गांठीभेटी घेतल्या व त्यांजपासून सामाजिक, राजकीय व शैक्षणिक प्रांतांतील त्यांच्या विचारसरणींचा दृढ परिचय करून घेतला. १९०७।१९०८ हीं सालें हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासांत अत्यंत महत्त्वाचीं होऊन गेलीं. या

काळांत महाराष्ट्राच्या केंद्रस्थानीं (पुण्यांत) झालेल्या सर्व सार्वजनीक व्याख्यानांपैकीं एकही भाषण ऐकण्याचें त्यांनीं चुकविलें नाहीं. अशा तऱ्हेच्या उत्तेजक चळवळींनीं व प्रक्षुब्ध वातावरणानें आमच्या भावना-प्रधान चरित्रनायकाच्या अंतःकरणांतील तरुण रक्त देशसेवेसाठीं त्यावेळीं सळसळून गेल्यास नवल तें कसलें!

याचा परिणाम असा झाला कीं, नाशिक येथें श्री त्यांनीं व्याख्यानें दिलीं त्यामुळें म्हणा, किंवा दे.भ. सावरकरबंधूंच्या कार्यकर्त्यांच्या यादींत नांव सांपडून कांहीं पत्रव्यवहार मिळाल्यामुळें म्हणा तेथील डि. मॅजिस्ट्रेटच्या वारंटावरून यांच्या घरची झडती घेण्यांत आली. व स्थानिक अधिका-ऱ्यांच्या रोषास राजकीय चळवळींत प्रामुख्यानें भाग घेत असल्यामुळें, ते बळी पडले. अत्यंत दारुण निराशेच्या काळांतहि हातपाय गाळण्याचे विचार त्यांच्या मनाला कधींहि शिवत नसत.

अनेक प्रापंचिक अडचणींच्या फेऱ्यांत गुरफटल्यामुळें यांना कॉलेजांतील आपल्या शिक्षणास व त्याबरोबरच सर्व चळवळींच्या उगम-स्थान अशा पुण्यास कायमचा रामराम ठोकणें भाग पडलें. या पुढील चार वर्षें त्यांनीं जैनशास्त्रें व कायदा यांचा व्यासंग करण्यांत घालविलीं. आपल्या धर्माच्या अभ्यासाबरोबर त्यांनीं इतर धर्मशास्त्रांचा तौलनिक-दृष्ट्या अभ्यास केला. या प्रदीर्घ आणि सतत अध्यापनाचा परिणाम म्हणजे जैनधर्मावरील उत्कृष्ट व चिरस्मरणीय अशीं पुस्तकें रचण्यांत झाला यांत शंका नाहीं. त्यांचीं हीं बहुमोल पुस्तकें म्हणजे (१) जैनधर्मादर्श (१९१०), (२) सामायिक पाठ (१९१२), (३) समाधिशतक (१९१२).

या सर्व पुस्तकांची भाषा मराठी असून तीं फार सोप्या व सुबोध अशा भाषेंत लिहिलेलीं असल्यामुळें तीं अत्यंत उपयुक्त व वाचनीय झालीं आहेत. जैनधर्मादर्शातील उतारे कै० डॉ० केतकरकृत ज्ञानकोशांत घेण्यांत आले आहेत. जैनधर्माचें सर्वांगसुंदर विवेचन या पुस्तकांत केलेलें असून ह्या धर्माची माहिती करून देणारे जे मराठी भाषेंत आजपर्यंत ग्रंथ लिहिण्यांत आले आहेत त्यांत यांच्या ग्रंथाचाच अग्रेसरत्वानें उल्लेख करावा लागेल. या पुस्तकांची नामांकित लेखकांनीं व वृत्तपत्रपंडितांनीं आकंठ स्तुति गायलेली आहे. जैन व जैनेतरांत जैनधर्मासंबंधीं सर्वत्र वावरणाऱ्या भ्रामक कल्पना दूर करण्याचें महत्त्वाचें कार्यहि या पुस्तकांत फारच परिणामकारक रीतीनें करण्यांत आलेलें आहे. अशा प्रकारची अत्यंत बहुमोल कामगिरी बजावणारीं हीं पुस्तकें महाराष्ट्र जैनवाङ्मय क्षेत्रांत ललामभूत बनून राहिल्यास त्यांत आश्चर्य तें काय? ही त्यांची चिरस्मरणीय साहित्यसेवा वयाच्या विसाव्या एकविसाव्या वर्षी झालेली पाहून त्यांच्या श्रेष्ठ बुद्धिमत्तेचें व दीर्घ परिश्रमाचें फार कौतुक वाटतें. सन १९१२ सालीं वकिलीच्या परिक्षेंत उत्तीर्ण होऊन सोलापूर शहरीं वकिली करण्यास त्यांनीं सुरवात केली. दे० भ० सामंत प्रभृति जुन्या वकिलांनीं त्यांना आपल्या धंद्यांत योग्य तें उत्तेजन दिलें, व सार्वजनिक चळवळींत दे० भ० बापूसाहेब लेले व सामंत यांच्याशीं सहकारितेनें मोठ्या उत्साहानें ते भाग घेत असत. वकिलीच्या धंद्यांत रा. शहांची हळुहळू प्रगति होत जाऊन १९२० सालीं त्यांची असिस्टंट पाब्लिक प्रासिक्युटरच्या जागीं नेमणूक झाली.

पुढील आठ वर्षांच्या काळांत त्यांनीं आपल्या देशांतील अनेक मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्यांच्या व विद्वानांच्या भेटी घेऊन वादविवाद केले. 'साहित्य-सभा' या नांवाची वाङ्मय संस्था स्थापन करून,

तिचे कार्यवाह या नात्यानें त्यांनीं तिची बरींच वर्षे निष्काम व निरलस सेवा बजावली. 'चर्चा मंडळाच्या' बैठकी भरवून तींत संस्कृत, इंग्रजी व मराठी वाङ्मयाचा अभ्यास ते करीत असत. या कार्यांत खालील सुप्रसिद्ध साहित्यसेवकांचें व देशभक्तांचें त्यांना नेहमीं उत्तेजन मिळत गेलें.

रा. ब. प्रो गणेश जनार्दन आगाशे, उस्मानाबादचे रा. नेमचंद गांधी वकील, सोलापूरचे सामंत वकील, जैनसमाजांतील सुप्रसिद्ध कवि व लेखक द. भि. रणदिवे, नवाकाळचे संपादक रा. काकासाहेब खाडिलकर व राष्ट्रमताचे संपादक एस्. के. दामले प्रभृति अनेक विद्वानांच्या मार्गदर्शकत्वाखालीं त्यांची पूर्वभूमिका चांगली तयार झाली.

दोन वर्षांच्या दीर्घ परिश्रमानंतर जैनांच्या एकमेवाद्वितीय अशा भगवानजिनसेनाचार्यकृत **आदिपुराण** काव्याच्या सहाय्यानें मराठी भाषेंत "महापुराणामृत" या नांवाचें अत्यंत सुंदर पुस्तक लिहून तें १९१५ सालीं प्रसिद्ध केलें. या कामीं रा. शहांनीं घेतलेले शारीरिक व बौद्धिक परिश्रम खरोखर अत्यंत प्रशंसनीय नाहींत असें कोण म्हणूं शकेल ? या ग्रंथाच्या निर्मितीनें मराठी वाङ्मयांत एका नवीनच पण अतिशय उपयुक्त अशा लेखनशैलीची भर पडली यानंतर त्यांनीं (१) श्री भगवज्जिनसेनाचार्य (२) श्री गुणभद्राचार्य (३) श्री पूज्यपादस्वामी (४) आणि श्रीमदमृतचंद्रसुरी यांचीं चरित्रें लिहिलीं. वरील सर्व चरित्रांत त्यांनीं या आचार्यांच्या प्रतिभासंपन्न ग्रंथांचें मोठें हृदयंगम सिंहावलोकन करून ऐतिहासिक दृष्ट्याहि अत्यंत दुर्मिळ व उपयुक्त माहिती मिळवून ती अभिनव पद्धतीनें वाचकांस सादर केली.

सन १९१५ सालीं यांनीं उत्तर हिंदुस्थानांत ५।६ महिने प्रवास करून अनेक तीर्थयात्रा केल्या. हिंदुस्थानचे माजी व्हाईसरॉय लॉर्ड हार्डिंग यांच्या हस्तें बनारस हिंदुविश्वविद्यालयाचा चिरस्मरणीय असा उद्घाटन समारंभ झाला; तो पाहण्याची अमूल्य व दुर्मिळ अशी संधि त्यांना मिळून त्या निमित्तानें तेथें जमलेल्या महात्मा गांधी, डॉ. ॲनीबेझंट, पं. मदनमोहन मालवीय, जगदीशचंद्र बोस आणि डॉ. रॉय इत्यादि जगप्रसिद्ध महान् विभूतींचीं व अनेक शिक्षणतज्ञांचीं व देशभक्तांचीं भाषणें श्रवण करण्याचा सुयोग त्यांना प्राप्त झाला. याच वेळीं काशी येथील जैन स्याद्वाद महाविद्यालयाचा वार्षिक समारंभ झाला, त्यांतहि यांनीं अत्यंत उत्साहानें व प्रामुख्यानें भाग घेतला. याप्रसंगी त्यांना ब्र० शीतल प्रसादजी व कुमार देवेंद्रप्रसाद इत्यादि थोर जैनसाहित्य-सेवकांशीं अनेक विषयांवर चर्चा करण्याची संधि लाभली.

मराठी भाषेचे प्रथितयश नाटककार श्रीयुत एस्. पी. जोशी यांच्या महाबळेश्वर येथें घडलेल्या अल्पशा सहवासांत रा. शहांना मराठी वाङ्मयाच्या निरनिराळ्या घटकांकडे बघण्याचा नवीन दृष्टिकोन लाभला. श्री. वा. रा. कोठारी बी. ए., पं. दरबारीलालजी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री यांच्याशीं अनेक प्रसंगीं झालेल्या चर्चात्मक वादविवादानें त्यांना जैन धर्मातील तत्वांची इतर धर्मांशीं सध्यां जगांत प्रचलित असलेल्या उदार व प्रागतिक विचारसरणीनुरूप कशी सांगड घालावी याची अभिनव दृष्टी त्यांना लाभली.

सोलापूर शहरीं वेळोवेळीं होणाऱ्या चळवळींत भाग घेऊन रा. शहांची सार्वजनिक सेवा करण्याची तळमळ थांबेना म्हणूनच कीं काय ते सोलापुराबाहेर घडणाऱ्या इतर प्रांतांतील चळवळींतही भाग घेऊं

लागले. " पिपल्स असोसिएशन " या संस्थेचे ते कित्येक वर्षे सभासद व सेक्रेटरी होते. सन १९१९ च्या डिसेंबरमध्यें सोलापूर येथें भरलेल्या 'मागसलेल्या प्रांतिक परिषदेचे' सेक्रेटरी या नात्यानें त्यांनीं त्या परिषदेची उत्तम प्रकारें सेवा बजावली व जनतेंत फार मोठी जागृति केली. पुणें येथें प्रागतिकांनीं डॉ० तेजबहादूर सप्रूंच्या अध्यक्षत्वाखालीं भरविलेल्या राजकीय परिषदेंतहि त्यांनीं चांगला भाग घेतला होता. तसेंच सोलापुरीं भरलेल्या सन १९२० सालच्या मुंबई प्रांतिक सामाजिक परिषदेच्या सेक्रेटरीचें काम फार उत्कृष्ट रीतीनें केलें. ह्या परिषदेचें सर नारायणराव चंदावरकर यांचे हस्तें उद्घाटन होऊन त्यांचें तीत प्रास्ताविक भाषण Inaugural speech झालें; व सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे अध्यक्ष कै० देवधर यांचे अध्यक्षतेखालीं तिचें अधिवेशन अत्यंत यशस्वी रीतीनें पार पडलें. अशा तऱ्हेच्या परिषदांत प्रमुखत्वानें चिटणीस या नात्यानें भाग घेतल्यामुळें महांच्या हिंदुस्थानांतील थोरथोर लोकांच्या ओळखी होऊन त्यांच्याशीं विचारविनिमय करण्याची सुसंधि त्यांना लाभली माजी शिक्षणमंत्रि नामदार बी व्ही. जाधव एम् ए. एल्एल्. बी., हल्लींच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळांतील मुंबई इलाख्याचे अर्थमंत्रि ना. ए. बी. लठ्ठे, रा. कोठारी, श्री. बाबासाहेब कामत तसेंच फर्ग्युसन कॉलेजांतील प्राध्यापक जोग, काळे व कानिटकर प्रभृति पुढाऱ्यांनीं सोलापूर येथें येऊन मागासलेल्या वर्गाच्या उन्नतिकरितां जी बहुमोल कामगिरी केली त्याचें बव्हंशीं श्रेय यांच्याकडेच देणें योग्य होईल.

सोलापूर येथें १९२० सालीं भरलेल्या मुंबई प्रांतिक अस्पृश्य परिषदेचें अधिवेशन या शहरीं भरविण्यांत यांनींच पुढाकार घेतला होता. तसेंच नगर येथें बॅ. बॅप्टिस्टा यांचे अध्यक्षतेखालीं झालेल्या मुंबई प्रांतिक राजकीय परिषदेसहि हे हजर होते.

नाशिक जिल्ह्यांत मांगीतुंगी येथें मुंबई इलाख्यांतील दिगंबर जैन लोकांचें शेठ हिराचंद रामचंद गांधी यांच्या अध्यक्षतेखालीं जें प्रांतिक अधिवेशन झालें त्यांत अनेक प्रागतिक मतांचा पुरस्कार करणारे जे ठराव पास झाले, त्याचें सर्व श्रेय रा. शहांच्या तडफदार प्रयत्नाकडे जातें.

१९२९ सालीं कट्टर सनातनी जैनांच्या बालेकिल्ल्यांत—सोलापुरांत—शहा यांनीं अत्यंत उत्साहानें ब्र० शीतलप्रसादजी यांच्या नेतृत्वाखालीं शुद्धिसमारंभ घडवून आणिला. हा शुद्धिसमारंभ म्हणजे जैनेतरांना सार्वजनिकरीत्या जैन करून घेण्याचा विधि होय. समाजसुधारणेच्या अशा प्रकारच्या अनेक कृत्यांत बऱ्याच प्रसंगीं त्यांना जीर्णमतवादी सनातनी बुद्रुकांच्या बोचकच नव्हे तर खोचक टीकाही सहन कराव्या लागल्या. पण त्यांनीं असल्या टीकेला किंवा त्यांच्या इतर प्रकारच्या छळाला दाद दिली नाहीं. व आपला सुधारकी बाणाही मुळींच सोडला नाहीं.

येथें एका गोष्टीचा प्रामुख्यानें निर्देश करणें अत्यंत जरूर आहे. पुणें येथें १९११ सालीं जैनबोर्डिंग उघडण्याचे समारंभाचे प्रसंगीं उपस्थित झालेल्या दक्षिण महाराष्ट्र जैन सभेच्या चालकांशीं विशेषतः **प्रो० लट्ठे, कर्मवीर धावते** प्रभृति पुढाऱ्यांशीं त्यांचा जो परिचय झाला त्याचें दृढिकरण सांगली बोर्डिंगच्या विद्यार्थ्यांनीं भरविलेल्या संमेलनप्रसंगीं अध्यक्षस्थानाची माळ त्यांच्या गळ्यांत घालून घडून आलें. सदर प्रसंगीं त्यांनीं विद्यार्थ्यांना केलेला उपदेश बहुमोल, अत्यंत उद्बोधक व स्फूर्तिजनक होता समाजाला अवनतीच्या गर्तेतून वैभवाच्या शिखरावर नेण्यास हल्लींच्या वातावरणांत ज्या तऱ्हेच्या पुढाऱ्यांची जरूरी असते तशा प्रकारचे कर्तृत्ववान पुढारी द. महाराष्ट्र जैनसभेचे चालक असल्याचे रा. शहांच्या निदर्शनास तेव्हांपासूनच आलें.

सन १९१५ पासून ते सन १९२५ सालापर्यंत मागासलेल्या वर्गांत व अस्पृश्य वर्गांत डॉ० परांजपे, श्री. काकासाहेब लिमये संपादक ज्ञानप्रकाश, प्रो० काळे, प्रो. कानिटकर, श्री. बाबासाहेब कामत व श्री. कोठारी तसेंच नामदार भास्करराव जाधव प्रभृति पुढाऱ्यांच्या समवेत जागृति करण्याचें कामीं फार मोठा पुढाकार त्यांनीं घेतला.

सोलापुरांत सन १९३३ सालीं भरविण्यांत आलेल्या आरोग्य सप्ताहाच्या चळवळींत त्यांनीं जी निरलस कामगिरी बजावली त्याबद्दल नगराध्यक्षांनीं त्यांना अभिनंदनपर पत्र पाठविलें.

अज्ञात कवि (श्री. मोतीलाल गांधी) कृत **पुरुषार्थसिद्धुपाय** व **वीरा**नुयायी (कविवर्य श्रीयुत मगदुम) यांनीं लिहिलेल्या **वीरशासन** या पुस्तकास त्यांनीं प्रस्तावना लिहिल्या असून त्या मोठ्या मार्मिक व संशोधनपूर्वक लिहिलेल्या आहेत. या प्रस्तावनेंत त्यांना जैनतत्वज्ञानाबद्दल वाटणारा परमादर व जैनसंस्कृतीबद्दलची त्यांची आत्मीयता स्पष्टपणें दिसून येते. जगाचा उद्धार जर कशानें व्हावयाचा असेल तर जैनतत्व-ज्ञानाच्या व संस्कृतीच्या पुनरुज्जीवनानेंच होईल अशी त्यांची दृढ भावना आहे; पण असें असूनहि त्यांना धर्माच्या नांवाखालीं चालत आलेले खुळसट व वेडपणाचे विधि, मूर्खपणाच्या रूढि व विषमतामूलक चालीरिति यांबद्दल अत्यंत तिटकाराच वाटतो, व त्यांच्या निरसनार्थ त्यांचे अव्याहत प्रयत्न चालू आहेत, हें येथें नमूद करणें अवश्य वाटतें.

प्रगति-जिनविजय, सत्यवादी, प्रभावना, जैनबोधक, सुदर्शन, सोलापूर समाचार वगैरे नियतकालिकांतून त्यांनीं लिहिलेले लेख मोठे उद्बोधक व विचारप्रवर्तक असेच आहेत. यासंबंधीं त्या त्या वृत्तपत्र-कारांनीं व इतर विद्वानांनीं जे स्तुतिपर उद्गार काढले आहेत ते येथें आम्हीं थोडक्यांत उध्दृत करतों.

सन १९३६ च्या अखेर शेठ हिराचंद नेमचंद यांच्या ८१ व्या वाढदिवसानिमित्त **प्रगती**चा खास अंक काढला, त्यावेळीं त्या पत्राचे विद्वान् संपादक व प्रसिद्ध इतिहास संशोधक रा. **पाटील** वकील यांनीं '**पांगुळ**गाडा' असा मथळा देऊन खालील उद्गार काढले आहेतः—

"विशेषांकाच्या प्रयत्नास लागलों म्हणण्यापेक्षां प्रयत्नास लाविलें असें म्हणणें अधिक युक्त व सत्य होईल. शेट साहेबाचे चहाते श्री० **शहा** वकील यांनीं आम्हांस कार्यतत्पर केलें, कर्तव्यबुद्धीची जाणीव दिली, मार्ग दाखविले व सर्व अडचणी दूर केल्या, या विशेषांकाचें श्रेय त्यांना आहे. वैगुण्याचे धनी आम्ही आहोंत. आमच्या पायांत ताकद येऊन रांगण्याऐवजीं आम्ही चालावें म्हणून त्यांनीं आम्हांस पांगुळगाडा दिला, पाऊल टाकतों असें पाहून बालामृत दिलें व आम्हांस चालण्यास शिकविलें."

या वाढदिवसाचे समारंभाचेवेळीं सेक्रेटरी या नात्यानें त्यांची झालेली सेवा बिनतोड असून या समारंभाच्या कल्पनेचे ते उत्पादकहि होते हें सांगणें जरूर आहे. खुद्द रा. हीराचंद शेठजींनींही त्यांच्या या अप्रतिम कार्यकुशलतेबद्दल व चिरस्मरणीय कामगिरीबद्दल प्रस्तुत लेखकाजवळ व जाहीर आभार पत्रकांतून प्रशंसोद्गारही काढले होते. शेठ हुकूमचंदजी यांचेशीं परिचय करून देतांना "यह बडे ग्रंथकार हैं; परीक्षाप्रधानी हैं" वगैरे गौरवपर उद्गार शेठसाहेबांनीं काढले होते. व रा. शहा यांच्या भगवान् जिनसेनांच्या चरित्रांत त्यांची योग्यता कालिदास कवीपेक्षां अधिक आहे याचें अत्यंत मार्मिक व परिणामकारक विवेचन वाचून संतोष प्रदर्शित केला. या निमित्तानें प्रगति व जैनबोधकाचे जे दोन विशेषांक काढविले त्यायोगें जैनांचा गेल्या ४०।५० वर्षांचा इतिहास संकलित करण्याचें बरेंचसें श्रेय त्यांना देणेंच योग्य होईल. तसेंच

सत्यवादींत त्यांनीं जे वेळोवेळीं लेख पाठविले त्यासंबंधीं सत्यवादीचे संपादक म्हणतात:—"महाराष्ट्रीय जैन समाजांतील एक सुप्रसिद्ध साहित्यिक व सोलापुरचे सुप्रसिद्ध वकील साहित्यचंद्र रा. ने. शहा यांचा हा महावीर अंकांतील लेख म्हणजे भगवान् **महावीराची जगन्मान्यता** दर्शविणारा सुंदर आरसाच होय." तसेंच दुसऱ्या एका लेखाबद्दल भगवान् महावीर व टॉलस्टाय यांची शिकवण यांमधील साम्य रा. शहा यांनीं सुंदर व सुबोध भाषेंत दर्शविलें आहे असें सत्यवादीकारानें म्हटलें आहे.

"जैनधर्माविषयीं आक्षिप्त विधानें व निरसन" या लेखमालेबद्दल सत्यवादी संपादक रा. पाटील म्हणतात:–" आपली सत्यवादींतील लेखमाला लोकांना फारच पटली. जैनतत्वज्ञानावरील अशी निरनिराळया पद्धतींची लेखमाला आपण कायम ठेवावी असें प्रो० उपाध्ये प्रभृतींचें म्हणणें आहे. अशी सुंदर लेखमाला चालूं केल्याबद्दल तरुण जैनांतर्फे व सत्यवादी पत्रातर्फे मी आपलें अभिनंदन करितों." "जैनधर्म व जैनतत्वज्ञान यासंबंधीं बाहेरील जैनसमाजांत बऱ्याच गैरसमजुती आहेत. अशा गैरसमजुती अजैनांनीं लिहिलेल्या निरनिराळया वाङ्मयांतून कशा आहेत हें सप्रमाण दाखवून देण्याकरितां सोलापूर येथील सुप्रसिद्ध जैन पुढारी, साहित्यिक व तत्वज्ञानाचे कळकळीचे अभ्यासक साहित्यचंद्र **रा. ने. शहा वकील** यांनीं परिश्रमपूर्वक लिहिलेले हे महत्वाचे लेख आहेत." तसेंच सत्यवादींतील 'अजंठाचें चटकदार असें प्रवास वर्णन' वाचनीय असेंच झालें आहे.

सत्यवादीचे रा. शहा हे सहसंपादक झाल्यानंतर, जैनांतील प्रथितयश इतिहासकार व नामांकित वृत्तपत्रपंडित रा. पाटील वकील यांनीं **प्रगतींत** जे पुढील उद्गार काढले ते अन्वर्थक आहेत असेंच कोणीहि म्हणेल:—

"अलिकडे सत्यवादींत स्वतंत्र जैनविभाग सुरू झाला असून त्यांत जैनतत्त्वज्ञान, धर्म व समाज यांजविषयीं अत्यंत विद्वत्ताप्रचुर असे लेख येऊं लागले आहेत. या जैनविभागाचे संपादक म्हणून सोलापूरचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते व वकील आणि जैनसाहित्यांतील अधिकारी लेखक श्रीयुत रा. ने. शहा यांची झाली असून ते तें काम अत्यंत उत्साहानें करीत आहेत."

सत्यवादींत प्रसिद्ध झालेल्या सदरीच्या लेखमालेंतून 'जैनधर्मांतील आक्षिप्त विधानें व त्यांचें निरसन' या नांवचें एक उपयुक्त पुस्तक नुकतेंच त्यांनीं लिहून प्रसिद्ध केलें असून त्यानें महाराष्ट्र जैन वाङ्मयांत चांगलीच भर टाकिली आहे. जैनधर्मासंबंधीं जे गैरसमज जैनेतरांत पसरलेले आहेत त्यांच्या निरसनार्थ ते गेलीं २५।३० वर्षे लेख, व्याख्यानें व इतर चळवळी करून जी जिवापाड मेहनत करीत आहेत ह्याबद्दल जैनसमाज त्यांचा सदैव ऋणीच राहील यांत शंका नाहीं.

**सोलापूर समाचार** या दैनिक पत्राच्या ( १९३७ ऑक्टोबर ) **साहित्यविशेषां**कांत रा. शहा यांचा 'प्रि० **अत्रे: विनोद : वाङ्मय**' हा लेख खुद्द आचार्य अत्रे यांना फारच आवडला याच लेखाबद्दल वेदशास्त्रसंपन्न विद्वद्वर्य रा **तात्यासाहेब श्रोत्रीय** लिहितात:- "श्रीयुत शहा वकील यांचा वरील लेख मी समग्र वाचला; व तो मला फार आवडला लेखकाच्या **मार्मिक वाङ्मय व्यासंगाची** त्यांत चांगली साक्ष पटते."

रा. शहा हे उत्तम टीकाकार असून त्यांनीं केलेलें ग्रंथांचें परीक्षण फारच विद्वत्ताप्रचुर व होतकरू लेखकांना मार्गदर्शक असेंच असतें. काव्याचें समालोचन केलेल्या त्यांच्या लेखांतून त्यांच्या दीर्घ व्यासंगाचा व अभ्यास आणि चिकित्सक वृत्तीचा चांगलाच प्रत्यय येतो.

महावीर–जयंतीची सार्वजनिक सुट्टी मिळावी म्हणून त्यांनीं जे अविश्रांत व अनुकरणीय प्रयत्न केले ते खरोखरच स्तुत्य होते. या कामीं जैनसाहित्यसेवामंडळ सोलापूरतर्फे ना. खेर मुख्य मंत्री यांना मानपत्र देऊन त्यावेळीं त्यांचेशीं केलेल्या खासगी चर्चेंतही त्याची आवश्यकता पटवून दिली. असे प्रयत्न सामुदायिकरित्या सर्व जैन समाजातर्फे होणें जरूर आहे असें वाटतांच पुण्याचे दे० भ० पोपटलाल शहा यांजकडे जाऊन त्यांचेशीं सहकार्य करून मुंबईचे सुप्रसिद्ध सॉलिसिटर मोतीचंद गिरधरीलाल कापडिया वगैरे लोकांना भेटून श्वेतांबर समाजांतर्फेही तसेंच ठराव सर्वत्र पाटवून देण्याची तजवीज केली.

मध्यप्रांताचे माजी मंत्री ना० डॉ० खरे यांजकडे अर्ज देऊन व त्यांची समक्ष भेट घेऊन महावीरजयंतीची सुट्टी Public Holiday त्यांच्या प्रांतांत सुरू करण्याची विनंती केली. अक्कलकोट संस्थानांत ही सुट्टी मिळवून देण्याचें कामीं ज्या ज्या सद्गृहस्थांचे प्रयत्न कारणीभूत झाले त्यापैकीं रा. शहा वकील हे एक प्रमुख होत. दोन वेळां शाळाखात्यांतील एज्युकेशनल इन्स्पेक्टर रा. दादासाहेब रेगे व अक्कलकोट संस्थानाशीं जिव्हाळ्याचे संबंध असलेले रा. बाबूराव जक्कल संपादक सोलापूर समाचार, लो. बोर्डाचे ॲ. ऑफिसर रा. भोंडे यांना मुद्दाम डेप्युटेशनांत बरोबर घेऊन मे० दिवाणसाहेबांची भेट घेऊन त्यासंबंधीं सार्वजनिक सभा भरवून हें काम त्यांनीं अगदीं यशस्वी रितीनें पार पाडिलें.

त्याचप्रमाणें सोलापूरीं जैनसाहित्यसेवामंडळ स्थापन करून, त्याचें कार्यवाह या नात्यानें मुंबई सरकारचे मुख्य प्रधान व शिक्षणमंत्री ना० खेर यांना मानपत्र देऊन शालेय पुस्तकांतील आक्षिप्त विधानें त्यांचे नजरेस आणून दिलीं; व तत्संबंधीं खालील अधिकाऱ्यांकडे योग्य ते हुकूम पाठविण्याची विनंति केली. तसेंच सेकंडरी टीचर्स कॉन्फरन्सचे

अधिवेशन सोलापूरीं भरलें असतां त्यावेळीं अनेक शिक्षणतज्ञांशीं व ना० खेर यांचेशीं संस्कृत, मागधी वगैरे भाषेतले जैनवाङ्मयांतले ग्रंथ दुय्यम शाळा व कॉलेजेसमधून सुरू करण्याबद्दल चर्चा केली; त्याकामीं गु० अण्णासाहेब कर्वे व रा. वामन मल्हार जोशी यांना भेटून नार्थीबाई दा. ठा. कॉलेजमधून व युनिव्हर्सिटीच्या दुय्यम शाळेतून जैनग्रंथ सुरू करण्याची अत्यंत आवश्यकता असल्याचें पटवून देऊन त्यांचेकडून तत्संबंधीं बुककमिटीकडे शिफारस करण्याचें आश्वासन घेतलें.

याप्रमाणें जैन साहित्यसेवामंडळाचे कार्यवाह या नात्यानें आमचे चरित्रनायकांनीं जी अमूल्य अशी जैनसाहित्यसेवा बजाविली व बजावित आहेत त्याबद्दल आचार्य खाड्ये, प्रो० सबनीस ( नाशिक ), पं० दरबारीलाल, ब्र० शीतलप्रसादजी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जेले प्रभृति विद्वान् साहित्यिकांनीं त्यांना धन्यवाद देऊन तसेंच प्रयत्न अधिक नेटानें चालू ठेवण्याबद्दल त्या सर्वांनीं सूचविलें आहे. त्यांचें वाचन दांडगें असून, अद्यापिसुद्धां ते एकाद्या विद्यार्थ्याप्रमाणें सरस्वतीची अव्याहतपणें सेवा करीत असल्याचेंच दिसून येतें त्यांनीं ज्या ज्या विषयांवर व्याख्यानें दिलीं तीं त्या विषयाचा सांगोपांग अभ्यास करूनच दिलेलीं असल्यामुळें त्यांतील विचार आज दोन तपें होऊन गेलीं तरीसुद्धां मननीय व ग्राह्य असेंच वाटतात. याचें प्रत्यंतर त्यांच्या अध्यक्षतेखालीं (सोलापूर) जैन-पाठशाळेचा सन १९२१ सालामध्यें जो बक्षिस-समारंभ झाला त्यावेळच्या भाषणावरून स्पष्टपणें दिसून येईल. " या शिक्षण संस्थेतून एकांगी शिक्षण न देतां, तुलनात्मक व चिकित्सक दृष्टीनें अभ्यास करणारे कर्तबगार विद्वान् निघाले पाहिजेत. संशोधनाची शास्त्रीय व आधुनिक पद्धत काय आहे याचें शिक्षण देण्याची येथें सोय झाली पाहिजे." असें सांगून ही संस्था आदर्शवत् व नमुनेदार होण्याकरितां संस्थेच्या चालकांनीं काय केलें पाहिजे याचें सुंदर विवेचन

केलें आहे. तसेंच सोलापूरीं श्राविकाश्रमाची जेव्हां स्थापना झाली त्यावेळीं जैनांची प्राचीन स्थिति कशी होती; सद्यःस्थिति काय झाली व भावी स्थिति कशी होईल याचें हुबेहूब चित्र रेखाटून स्त्रीशिक्षणासंबंधीं जे विचार प्रदर्शित केले ते आजमित्तीससुद्धां मार्गदर्शकच वाटतात. हरिभाई देवकरण हायस्कूलच्या व नॉर्थकोट हायस्कूलच्या गॅदरिंगच्यावेळीं व बार्शी, निपाणी, कऱ्हाड, मालेगांव, नगर वगैरे ठिकाणीं त्यांनीं केलेलीं भाषणें फारच परिणामकारक झालीं. वाङ्मयविषयक जैनकविसंमेलन प्रसंगींचें त्यांचें भाषण त्यांच्या अभ्यासू वृत्तीचें व दीर्घ व्यासंगाचें द्योतक असेंच झालें

सन १९३६ व १९३७ सालीं सोलापूर येथें श्री. खांडेकर व आचार्य अत्रे यांच्या अध्यक्षतेखालीं जीं दोन साहित्यसंमेलनें झालीं त्यांत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता; व या दोघांही थोर साहित्यिकांशीं प्रत्यहीं कित्येक तासपर्यंत साहित्यविषयक चर्चा करण्यांत घालविले. त्यावेळीं अत्र्यांच्या विनोदी स्वभावाची व खांडेकरांच्या खेळाडू वृत्तीची त्यांना चांगलीच ओळख पटली. सन १९३७ सालीं साहित्यसमेलनाच्या कार्यकारी मंडळानें त्यांचेवर **'सोलापूर-जिल्हा साहित्य-सूची'** तयार करण्याचें काम सोपविलें; व तें त्यांनीं २-३ महिने निरलसपणें अविश्रांत काम करून उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. या सूचीकडे वरवर दृष्टी टाकली तरीसुद्धां त्या सूचींतील लेखकांपैकीं शेकडा ७५ लेखक जैन असून त्यांनीं जैन धर्मावर निरनिराळे ग्रंथ लिहिल्याचें स्पष्टपणें दिसून येतें. ही सूची सो. समाचार पत्राच्या १९३७ च्या साहित्यांकांत प्रसिद्ध झाली आहे. त्यांचे जवळ गेल्या ७५ वर्षांतील जैन-साहित्य-सूचीहि लिहून तयार आहे.

साहित्याच्या प्रांगणांत ज्याप्रमाणें श्वेतांबर दिगंबरादि भेद नसावेत त्याचप्रमाणें महावीरजयंतिसारख्या मंगल कार्यांत भिन्नभिन्न पंथांच्या व धर्मांच्या लोकांनीं असे उत्सव राष्ट्रीय समजून सामुदायिकरित्या साजरे करावेत म्हणून ते दीर्घप्रयत्न करीत असतात.

त्यांच्या वाङ्मयविषयक अडीच तपाच्या तपश्चर्येचें महत्त्व ओळखून बृहन्महाराष्ट्र जैनसाहित्यसंमेलनाच्या द्वितीय अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. त्यावेळीं प्रगति पत्रांत त्यांचेसंबंधीं खालीलप्रमाणें प्रशंसोद्गार काढले आहेत:—

" परिषदेचे अध्यक्ष सोलापूरचे आदरणीय नागरिक साहित्यचंद्र रा. ने. शहा वकील यांची निवड करण्यांत स्वागत कमेटीनें खरोखरीच गुणग्राहकता दाखविली आहे याबद्दल शंका नाहीं. जैनसाहित्य–परिषदेचें कार्य श्री. रावजी नेमचंदसारख्या साहित्य–सम्राटांच्या देखरेखीखालीं अधिक विस्तृत होईल; व सरस्वतीचे दालनांत जैनसाहित्यिकांना बहुमानाची जागा पटकावण्यास संधि आणील अशी आम्हांस उमेद आहे."

श्रीक्षेत्रस्तवनिधि येथें ता. ३१।१।३८ रोजीं दुसऱ्या जैनसाहित्य संमेलनाचें अधिवेशन आमच्या चरित्रनायकाच्या अध्यक्षतेखालीं अत्यंत उत्साहानें व यशस्वी रितीनें पार पडलें. त्याला जोडूनच द० म० जैनसभेचें ३८ वें अधिवेशनहि मोठ्या थाटाचें झालें. याचप्रसंगीं "जैन धर्मासंबंधीं आक्षिप्त विधानें व निरसन" या त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ **श्रीलक्ष्मीसेन महाराज भट्टारक** यांच्या हस्तें होऊन त्याच्या प्रती वाटण्यांत आल्या. या अधिवेशनाबद्दल द० म० जैनसभेचें मुखपत्र म्हणतें:—" जैनसाहित्यसंमेलनाचें अधिवेशन म्हणजे यंदाच्या अधिवेशनांतील पांचवें वैशिष्ट्य होय. स्वागताध्यक्ष **कर्मवीर धावते** व अध्यक्ष **साहित्यचंद्र** श्री. **शहा** यांचीं भाषणें

वाचिलीं तर **साहित्य-प्रकाशनांतच** खरीखुरी **धर्मप्रभावना** आहे याची सत्यता पटेल. अध्यक्ष शहांचें भाषण म्हणजे दिवंगत व विद्यमान जैनसाहित्यिकांचा त्रोटक **इतिहासच** आहे." साहित्यसंमेलनाच्या अधिवेशनाच्या यशस्वितेसंबंधीं पुढें प्रगतिकार म्हणतात:—" या साहित्य परिषदेंत इतर ज्या अनेक वक्त्यांचीं भाषणें झालीं त्यांवरून जैनसाहित्याचा सूर्य उगवून तो लवकरच आपल्या प्रखर तेजानें तळपूं लागेल अशी आशा धरल्यास ती खास अनाठायीं होणार नाहीं."

दिगंबर-जैनपत्र म्हणतें:- "श्री शहा वकीलके व्याख्यानमें दक्षिणमें जैन साहित्यकी सेवा करनेवाले प्राचीन-अर्वाचीन जैन कवि व लेखकोंका इतिहासभी है बहुत खोजके साथ व्याख्यान तयार किया गया है."

दक्षिणमहाराष्ट्र जैनसभेच्या ३८व्या अधिवेशनांत त्यांनीं प्रामुख्यानें पुढाकार घेऊन त्यांचे जिव्हाळ्याचे जे दोन विषय त्यांवर ठराव मांडून त्यांनीं प्रभावशाली व दणदणीत भाषण केलीं. ते विषय म्हणजे तीर्थक्षेत्रासंबंधीं दिगंबर श्वेतांबर यांमधील वादाचे निकाल लवादामार्फत करून घ्यावेत हा एक व दुसरा म्हणजे जैनांतील सर्व पंथांची संयुक्त परिषद भरविणें. याकरितां जी एक कमिटी नेमिली त्यांत तेहि एक आहेत. या संयुक्त परिषदेच्या कामीं लोकमत अजमाविण्याकरितां त्यांनीं निपाणी, कऱ्हाड, सांगली, कोल्हापूर, मालेगांव, नगर इत्यादि ठिकाणीं दौरा काढिला; व श्वेतांबरांतील प्रमुख कार्यकर्ते दे० भ० मूळचंदभाई पारीख बी. ए. यांच्या सहकार्यानें या विषयासंबंधीं मोठीच जागृति टिकठिकाणीं केली.

मुंबई येथें बॅ० सावरकर यांच्या अध्यक्षतेखालीं साहित्यसंमेलनाचें जें एप्रिल १९३८ मध्यें अधिवेशन झालें त्यावेळीं झालेल्या सर्व कार्यक्रमांत

रा. शहा हे हजर होते. विशेषतः " इतिहास-संशोधन हा शुद्ध उपद्व्याप आहे." या विषयावर प्रो० दत्तोपंत पोतदार यांचे अध्यक्षतेखालीं जी चर्चा झाली त्यावेळीं संमेलनाचे प्रमुख चिटणीस रा. वर्दे व रा. पाध्ये यांच्यामध्यें बरीच बाचाबाची होऊन गुद्दागुद्दी होण्यापर्यंत मजल गेली होती; याप्रमाणें सभेचें वातावरण अत्यंत गरमागरम झालें असतांनाच रा. शहा यांना अध्यक्षांनीं त्याच विषयावर बोलण्यास पाचारण केलें. त्यावेळीं त्यांनीं जें भाषण केलें तें अतिशय समयोचित झाल्यामुळें सर्वत्र पुन्हां शांतता झाली. व त्यांचे भाषणाची सर्वांनींच वाहवा केली. केसरी, ज्ञानप्रकाश, प्रभात आदि पत्रांनीं या भाषणासंबंधीं स्तुतिपर उद्गार काढतांना " रा. शहा यांनीं वकिली चातुर्यानें तो विषय अविवेकी असल्याचें स्पष्टपणें सांगितलें." असेंच म्हटलें आहे.

मालेगांव येथील जिनमंदिराच्या सुवर्णज्युबिली उत्सवाकरितां ते मुद्दाम तेथें हजर राहिले; व सर्व कार्यक्रमांत मोठ्या उत्साहानें भाग घेऊन बरींच सुविचार परिप्लुत अशीं भाषणें करून त्यांनीं तेथील लोकांचीं अंतःकरणें काबीज करून घेतलीं. व महिलावर्गांतहीं दांडगी जागृति केली. " **तौलनिक** दृष्ट्या **जैनधर्माचें वैशिष्ट्य** " हा त्यांचा प्रबंध अत्यंत विद्वत्ताप्रचुर असून त्यांत सर्व तत्त्वज्ञानांतील व धर्मांतील निष्कर्ष काढून जैनधर्माचें वैशिष्ट्य व श्रेष्ठत्व दाखविलें आहे. सन १९३८ मध्यें अजंठा व वेरूळ येथील लेणीं पाहून त्याचें चटकदार वर्णन केलें. व हीं लेणीं जैनसंस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचा उत्कृष्ठ पुरावा होय हें त्यांनीं आपल्या निबंधांत फार मार्मिकपणें सिद्ध करून दाखविलें.

आपल्या वकिलीच्या व्यवसायांत त्यांच्या कामासंबंधानें मोठमोठ्या न्यायमूर्तींनीं जे प्रशंसोद्गार काढले आहेत, त्यावरून त्यांची या क्षेत्रांतील नैपुण्याची कोणासही सहज कल्पना येईल.

न्यायमूर्ती **श्री. जे. डी. दिक्षित** डिस्ट्रिक्ट अॅण्ड सेशन्स जज्ज, सोलापूर. म्हणतातः-

Mr. R N. Shah, Asst. Public Prosecutor has been a gentleman of conspicuous ability studies his cases carefully, and does his work consciously and well. He is a good Speaker and places his points and arguments systematically and in an impressive manner" Dated 27-12-1920.

मे० **दिक्षीतसाहेब** म्हणतातः- "श्री. आर. एन्. शहा, पब्लीक प्रॉसिक्यूटर हे अत्यंत कुशाग्र बुद्धीचे असून ते आपलीं कामें दक्षतापूर्वक व चांगल्या रीतीनें करतात. ते एक चांगले वक्ते असून आपले मुद्दे व तक्रारी परिणामकारक व पद्धतशीर रीतीनें पुढें मांडतात."

सोलापुरचे डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज **श्री. सी. एन्. मेथा** यांनीं ता. २-१०-१९२२ रोजीं खालील प्रमाणें प्रशंसोद्गार काढले आहेत.

I have seen your work as Asst. Public Prosecutor and I have very great pleasure in stating to you that you have always satisfied me by the way in which you have put your cases before me. You possess more than average abilities and your knowledge of law is quite up-to-date. Your arguments were never tiresome. Your fluency of speach was remarkable.

डि. व से. जज श्री. मेथा म्हणतात:—"मी तुमचें सरकारी वकील या नात्यानें काम पाहिलें, आणि माझ्यापुढें आपण ज्या पद्धतीनें आपले खटले चालविले त्यायोगें तुम्ही मला नेहमीं संतुष्टच केलें हें कळविण्यास मला फार आनंद वाटतो. आपल्या अंगीं विशेष बुद्धिमत्ता असून आपलें कायद्याचें ज्ञान अगदीं आजतागायत-पावेतोचें आहे. आपल्या तक्रारी मला केव्हांही कंटाळवाण्या वाटल्या नाहींत; आपलें वक्तृत्व वाखाणण्याजोगें होतें."

आमच्या चरित्रनायकाचीं सर्व अपत्यें सुशील, सुप्रवृत्त अशींच आहेत. मुलामुलींच्या शिक्षणाच्या बाबतींत अनुवंशिक विषमतेचा यत्किंचित्‌ही गंध त्यांच्या प्रेमळ अंतःकरणाला शिवत नसल्याचें त्यांच्या मुलींच्या प्रेमळ, सुशील, शालीन व ज्ञानसंपन्न आचारविचारांवरून स्पष्ट निदर्शनास येत आहे. दोन्ही मुली चांगल्या सुशिक्षित व सुविचारसंपन्न असून, धाकटी मुलगी कु. कांताबाई पुणें येथें महिलाविद्यालय (College) मध्यें दुसऱ्या वर्षाचा S. Y. चा अभ्यासक्रम पूर्ण करीत आहे.

यापूर्वी दिगंबर-जैन शिक्षणविशेषांक, सोलापूर-समाचार वगैरे वृत्तपत्रांतून त्यांचा परिचय करून देण्यांत आलेला आहे.

शेवटीं खुद्द सोलापूर शहरांत रा. कल्याणशेट्टी बी. ए. एल्‌एल्. बी. वकील यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या सुप्रसिद्ध अशा सुदर्शन पत्रांतील उतारा देऊन हा परिचयलेख पूर्ण करितो:—

"रा. शहा यांचीं राजकीय मतें प्रागतिक व ब्राह्मणेतर पक्षाच्या चळवळीस पोषक व कोठारी पक्षाशीं सहमत होतीं. त्यांच्या हातून जैन-साहित्यविषयक बरेंच लिखाण लिहिलें जात आहे. जैनसाहित्याच्या प्रचारार्थ व संशोधनार्थ ते झटत असतात, त्याचें प्रत्यंतर म्हटलें म्हणजे

सत्यवादी पत्रांतून जैनविषयक विविध प्रकारचे प्रसिद्ध झालेले त्यांचे लेख. याशिवाय ते सत्यवादी पत्राच्या जैनविभागाचे संपादकहि आहेत. सोलापुरांतील चांगल्या वक्त्यांत त्यांची गणना होते. नुकत्याच भरलेल्या द० महाराष्ट्र जैन–साहित्य संमेलनाच्या परिषदेंत झालेलें त्यांचें अध्यक्षीय भाषण फारच विचारपरिप्लुत व परिणामकारक ठरलें; व यामुळें त्यांची जैनसाहित्यविषयक अधिकारवाणी स्पष्टपणें निदर्शनास आली. सार्वजनिक कार्यकर्ते म्हणूनहि त्यांची कामगिरी कांहीं कमी नाहीं. सोलापूरांत भरलेल्या दुसऱ्या मराठी साहित्यसंमेलनाचे ते प्रमुख कार्यवाहकांपैकीं एक होते."

अशाच प्रकारें सार्वजनिक व साहित्यविषयक सेवा करण्याकरितां श्रीवीरभगवान् त्यांना आरोग्य व दीर्घायुष्य देवो हीच प्रार्थना येथें करतों. प्रथम हें चरित्र मी इंग्रजींत लिहिलें होतें; पुढें त्याच्याच आधारानें हा मराठी अनुवाद केला आहे.

# विषयानुक्रमणिका.

# पं. जिनदत्त दादा उपाध्याय

यांचा

## समाधिशतकावरील काव्यात्मक अभिप्राय.

[ गीति ]

श्रीपूज्यपादविरचित 'समाधिशतका' करी मराठींत ।
श्री नेमिचंद तनयें स्वपरहितलागि या विलोकांत ॥
श्री जिनवाणी जगतीं प्रसार व्हाया करी आम्हां मदत ।
तनमनधन अर्पूनी धरूनिया धर्मस्नेह चित्तांत ॥
भाषांतरावरूनी आध्यात्मिक-विषय-प्रेम तें दिसतें ।
देवो सुबुद्धि श्रीजिन जिनशासनीं भक्ति रावजी यातें ॥

मालगांव,
ता. १०-१०-३८

दादा-तनय.

या मालेकडून अवघ्या वर्ष दीड वर्षांत १०-१२ पुष्पें प्रसिद्ध होऊन चौदा पंधराशें रुपयांचें शास्त्रदान झालें आहे.

# अर्पण-पत्रिका.

चारित्रचक्रवर्ति

**श्रीमदाचार्य शांतिसागर**

**महाराजांचे सच्छिष्य**

तपोनिष्ठ श्री १०८

**पायसागर मुनिमहाराज**

यांना

त्यांचें आदर्श चारित्र्य, प्राभाविक प्रवचनपटुता,
जैन-वाङ्मयावरील अगाध प्रेम व सद्धर्म
साहित्य-प्रभावनार्थ त्यांनीं चालविलेला
प्रशंसनीय दीर्घोद्योग इत्यादि
सद्गुणांचे स्मरणार्थ हा अध्यात्मपर ग्रंथ
परमादरपूर्वक अर्पण केला आहे.

भाषांतरकार,

रावजी नेमचंद शहा.

# समाधिशतक.

चारित्रचक्रवर्ति श्रीमदाचार्य शांतिसागर महाराज यांचे
परम शिष्य
श्री १०८ पायसागर महामुनि महाराज.

॥ श्रीवीतरागाय नमः ॥

# ॥ अथ समाधिशतकं प्रारभ्यते ॥

सिद्धं जिनेन्द्रमलमप्रतिमप्रबोधं ।
निर्वाणमार्गममलं विबुधेन्द्रवन्द्यम् ॥
संसारसागरसमुत्तरणप्रपोतं ।
वक्ष्ये समाधिशतकं प्रणिपत्य वीरम् ॥ १ ॥

अर्थ—ज्याचें ज्ञान अतिशय म्हणजे प्रत्येक क्षणीं सर्व वस्तूंना विषय करणारें अर्थात् जाणणारें असें असल्यामुळें संपूर्ण असें आहे, जो मोक्षाचा निर्दोष असा प्रत्यक्ष मार्गच असा आहे, जो सुरेंद्रांनाहि वंद्य असा आहे, आणि जो भव्यजीवांना ह्या संसारसमुद्रांतून तरून नेणारी नौकाच कीं काय असा आहे, अशा त्या सिद्धात्मरूप झालेल्या महावीर जिनेंद्राला वंदन करून, मी समाधिशतक नांवाचा ग्रंथ सांगण्यास प्रारंभ करितों. समाधिशतकावर टीका करणारे जे श्रीप्रभाचंद्र आचार्य; त्यांचें टीकाग्रंथाच्या आरंभीचें हें मंगळाचरण आहे.

श्रीपूज्यपादस्वामी मुमुक्षूणां मोक्षोपायं मोक्षस्वरूपं चोपदर्शयितुकामो निर्विघ्नतः शास्त्रपरिसमाप्त्यादिकं फलमभिलषन्निष्टदेवताविशेषं नमस्कुर्वाणो येनात्मेत्याह—

येनात्माऽबुध्यतात्मैव परत्वेनैव चापरम् ॥
अक्षयानन्तबोधाय तस्मै सिद्धात्मने नमः ॥ १ ॥

टीका— अत्र पूर्वार्द्धेन मोक्षोपाय उत्तरार्द्धेन च मोक्षस्वरूपमुपदर्शितम्। सिद्धात्मने सिद्धपरमेष्ठिने सिद्धः सकलकर्मविप्रमुक्तः स चासावात्मा च तस्मै नमः। येन किं कृतं ? अबुध्यत ज्ञातः। कोऽसौ ? आत्मा, कथं ? आत्मैव। अयमर्थः येन सिद्धात्मनाऽत्रात्मैवाध्यात्मैवात्मत्वेनाबुध्यत न शरीरादिकं कर्मोत्पादितसुरनरनारकतिर्यगादिर्जीवपर्यायादिकं वा। तथा परत्वेनैव चापरं अपरं च शरीरादिकं कर्मजनितमनुष्यादिजीवपर्यायादिकं वा परत्वेनैवात्मनो भेदेनैवाबुध्यत। तस्मै कथम्भूताय-अक्षयानन्तबोधाय अक्षयोऽविनश्वरोऽनन्तो देशकालानवच्छिन्नस्समस्तार्थपरिच्छेदको वा बोधो यस्य तस्मै। एवंविधबोधस्य चानन्तदर्शनसुखवीर्यैरविनाभावित्वसामर्थ्यादनन्तचतुष्टयरूपायेति गम्यते। ननु चेष्टदेवताविशेषस्य पञ्चपरमेष्ठिरूपत्वात्तदत्र सिद्धात्मन एव कस्माद्ग्रन्थकृता नमस्कारः कृत इति चेत् ग्रन्थस्य कर्तुर्व्याख्यातुः श्रोतुरनुष्ठातुश्च सिद्धस्वरूपप्राप्त्यर्थत्वात्। यो हि यत्स्वरूपप्राप्त्यर्थी— (स तं नमस्करोति। यथा धनुर्वेद प्राप्त्यर्थी इति मध्ये स्खलितं भाति—) धनुर्वेदविदं नमस्करोति। सिद्धस्वरूपप्राप्त्यर्थी च समाधिशतकशास्त्रस्य कर्ता, व्याख्याता, श्रोता, तदर्थानुष्ठाता चात्मविशेषस्तस्मात्सिद्धात्मानं

नमस्करोतीति ॥ सिद्धशब्दैनैव चार्हदादीनामपि ग्रहणम् । तेषामपि देशतः सिद्धस्वरूपोपेतत्वात् ॥

अर्थ—ज्यानें आत्मा हाच आत्मत्वेंकरून जाणला अशा अविनाशी आणि अपरिमितज्ञानस्वरूप असलेल्या सिद्धात्म्याला मी नमस्कार करतों.

भावार्थ—श्रीपूज्यपादस्वामी मोक्षाची इच्छा करणाऱ्या भव्यजीवांस मोक्षाचा उपाय आणि मोक्षाचें स्वरूप ह्याचें ज्ञान करून द्यावें अशी इच्छा करणारा असे होत्साते आरंभिलेलें हें समाधिशतक नांवाचें शास्त्र निर्विघ्नपणें समाप्त होऊन तें प्रसिद्ध व्हावें ह्या इच्छेनें ह्या श्लोकांत आपल्या इष्ट देवतेला नमस्कार करणें हें मंगल करितात—

ह्या श्लोकांत आचार्यांनीं नुसतें मंगलाचरणच केलें आहे असें नसून, श्लोकाच्या पूर्वार्धांत मोक्षाचा उपाय आणि उत्तरार्धांत मोक्षाचें स्वरूपहि सांगितलें आहे; असें समजावें. ह्या श्लोकांतील आचार्यांची इष्टदेवता 'सिद्धात्मा' ही आहे. सिद्धात्मा म्हणजे सर्व कर्मांपासून मुक्त झालेला आत्मा होय. ह्यावरून संपूर्ण कर्मांपासून मुक्त होणें ह्याचें नांव मोक्ष होय. हा मोक्ष जीवात्म्यालाच प्राप्त होणारा असल्यानें ज्याला आपण आज जीवात्मा म्हणत आहोंत तोच कर्मबंधापासून मुक्त झाल्यानें सिद्धात्मा होतो ही गोष्ट अर्थसिद्ध आहे. हा

सिद्धात्मा केवलज्ञानस्वरूप असतो. तें केवलज्ञान अक्षय म्हणजे अविनाशी आणि अनंत म्हणजे अपरिमित—अर्थात् अमुक देशापुरतें व अमुक कालापुरतें असें नसून सर्व लोकालोकाला विषय करणारें व अनंतकाल रहाणारें—असें असल्यामुळें तो सिद्धात्माही अविनाशी व अनंत अशा ज्ञानस्वरूपानें वास करणारा आहे. ह्यावरून अविनाशी आणि अनंत असें ज्ञान हेंच मोक्षाचें स्वरूप होय हें सिद्ध होतें. ह्या ठिकाणीं श्लोकांत "अविनाशी आणि अनंत असें ज्ञान" हेंच सिद्धात्म्याचें स्वरूप जरी सांगितलें आहे, तथापि अनंतदर्शन, अनंतवीर्य आणि अनंतसुख ह्यांना सोडून न रहाणें हें ह्या अनंतज्ञानाचें सामर्थ्यच असल्यानें त्यांचाही ह्यांत अंतर्भाव होतो. त्यामुळें—अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतसुख आणि अनंतवीर्य ह्यांचा समूह हें—सिद्धात्म्याचें वास्तवस्वरूप होय असें जाणावें. हा सिद्धात्मा शुद्ध आत्म्यालाच आत्मत्वानें जाणतो आणि शरीर, देव, मनुष्य, नारक, तिर्यंच हे पर्याय ह्या सर्वांना परकीयपणानें म्हणजे आत्म्याहून भिन्नपणानें जाणतो. अर्थात् आत्म्यालाच आत्मत्वानें जाणणें व इतर शरीरादि अनात्मपदार्थांना अनात्मत्वेंकरून जाणणें हा मोक्षाचा उपाय होय असें समजावें.

आतां ह्या ठिकाणीं अशी शंका येते कीं—पंचपरमेष्ठी ही इष्टदेवता असून बाकीच्यांचा त्याग करून ग्रंथकारानें फक्त

सिद्धपरमेष्ठीलाच ( सिद्धात्म्यालाच ) नमस्कार कां केला? ह्या शंकेचें समाधान असें कीं, ह्या शास्त्रनिरूपणाचें मुख्य-प्रयोजन—ग्रंथकर्ता, व्याख्यानकर्ता, श्रोता आणि ग्रथांत सांगितल्याप्रमाणें वागणारा ह्या सर्वांना सिद्धस्वरूपाची प्राप्ति होणें—हें आहे. तेव्हां सिद्धस्वरूपाच्या प्राप्तीकरितां सिद्धात्म्याला नमस्कार करणें हें योग्यच आहे. कारण, ज्याला ज्या स्वरूपाची प्राप्ति व्हावी अशी इच्छा असेल तो त्या स्वरूपालाच नमस्कार करीत असतो. उदाहरणार्थ, ज्या मनुष्याला धनुर्वेदाच्या प्राप्तीची इच्छा असेल, तो मनुष्य धनुर्वेद जाणणाऱ्यालाच नमस्कार करतो. ह्यावरून ग्रंथकर्ता, व्याख्यान-कर्ता, श्रोता आणि ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें वागणारा हे सर्व सिद्धस्वरूपाच्या प्राप्तीची इच्छा करणारे असल्यामुळें सिद्धात्म्याला नमस्कार करणें हें योग्य आहे. दुसरें असें कीं, अर्हन्परमेष्ठी वगैरेंचेंहि सिद्धशब्दानेंच ग्रहण होतें. कारण, तेही अंशत: सिद्धस्वरूपच आहेत, असें असल्यानें एका सिद्धपर-मेष्ठीला नमस्कार केल्यानें पंचपरमेष्ठीला नमस्कार केल्याचें अर्थत:च सिद्ध होतें असें समजावें.

अथोक्तप्रकारसिद्धस्वरूपस्य तत्प्राप्त्युपायस्य चोपदेष्टारं सकलात्मानमिष्टदेवताविशेषं स्तोतुमाह—

जयन्ति यस्यावदतोऽपि भारती- ।
विभूतयस्तीर्थकृतोऽप्यनीहतु: ॥

शिवाय धात्रे सुगताय विष्णवे ।
जिनाय तस्मै सकलात्मने नमः ॥ २ ॥

टीका- यस्य भगवतो जयन्ति सर्वोत्कर्षेण वर्तन्ते । काः ? भारतीविभूतयः भारत्याः वाण्याः विभूतयो बोधितसर्वात्महितत्वादि-सम्पदः । कथम्भूतस्यापि जयन्ति ? अवदतोऽपि ताल्वोष्ठपुटव्यापारेण वचनमनुच्चारयतोऽपि । उक्तं च-यत्सर्वात्महितं न वर्णसहितं न स्पन्दितोष्ठद्वयं । नो वाञ्छाकलितं न दोषमलिनं न श्वासरुद्धक्रमं ॥ शान्तामर्षविषैः समं पशुगणैराकर्णितं कर्णिभि- । स्तन्नः सर्वविदः प्रनष्टविपदः पायादपूर्वं वचः ॥ १ ॥ अथवा भारती च विभूतयश्च छत्रत्रयादयः । पुनरपि कथम्भूतस्य ? तीर्थकृतोऽप्यनीहतुः ईहा वाञ्छा मोहनीयकर्मकार्यं, भगवति च तत्कर्मणः प्रक्षयात्तस्याः सद्भावानुपपत्ति-रतोऽनीहतुरपि तत्करणेच्छारहितस्यापि; तीर्थकृतः संसारोत्तरणहेतुभू-तत्वात्तीर्थमिव तीर्थमागमः, तत्कृतवतः । किं नाम्ने तस्मै ? सकलात्मने शिवाय, शिवं परमसौख्यं परमकल्याणं निर्वाणं चोच्यते, तत्प्राप्ताय । धात्रे असिमसिकृष्यादिभिः सन्मार्गोपदेशकत्वेन च सकललोकाभ्युद्धारकाय । सुगताय शोभनं गतं ज्ञानं यस्यासौ सुगतः, सुष्टु वा अपुनरावर्त्यगतिं गतं, सम्पूर्णं वा अनन्तचतुष्टयं गतः प्राप्तः सुगतस्तस्मै । विष्णवे केवलज्ञानेनाशेषवस्तुव्यापकाय । जिनाय अनेकभवगहनप्रापणहेतून् कर्मारातीन् जयतीति जिनस्तस्मै । सकलात्मने सह कलया शरीरेण वर्तत इति सकलः स चासावात्मा च तस्मै नमः ॥

अर्थ—तीर्थंकर असूनही वीतराग असलेल्या ज्या भगवंताच्या—उच्चारणावांचून उत्पन्न होणाऱ्या—दिव्य वाणीचें

वैभव उत्कर्ष पावत आहे; त्या सर्व जीवांचें कल्याण करणाऱ्या, सिद्धगतीला प्राप्त झालेल्या आणि आपल्या केवलज्ञानानें सर्व वस्तूंस जाणणाऱ्या व कर्मशत्रूंचा नाश करणाऱ्या शरीरधारी आत्म्याला मी नमस्कार करतों.

भावार्थ—मागील श्लोकांत जें सिद्धात्म्याचें स्वरूप सांगितलें आहे त्याचा आणि त्या सिद्धस्वरूपाची प्राप्ति होण्याच्या उपायाचा उपदेश करणाऱ्या सकलात्मारूपी इष्टदेवतेची स्तुति करण्याकरितां हा श्लोक आचार्यांनीं केला आहे. ती इष्टदेवता, जिन म्हणजे अनेकभवांच्या प्राप्तीला कारणीभूत असलेल्या कर्मरूपी शत्रूंना जिंकणारा सकलात्मा म्हणजे देह धारण करणारा अर्थात् चरमशरीरी असा आत्मा, ही होय. हा चरमशरीरी आत्मा कोणता? हें स्पष्ट कळण्याकरितां व तो नमस्कार करण्याला योग्य आहे हें दाखविण्याकरितां आचार्यांनीं त्या आत्म्याच्या स्वरूपाचा बोध करून देणारीं विशेषणें योजिलीं आहेत. त्यांत पहिलें विशेषण जो तीर्थंकर असून वीतराग म्हणजे निरिच्छ आहे; हें आहे. ह्यांत आचार्यांची इष्टदेवता जो आत्मा, तो तीर्थंकर असल्यानें आम्हां सर्वांस पूज्य आहे असें सिद्ध होतें. तीर्थंकराच्या मोहनीयकर्माचा नाश होत असल्यानें व इच्छा हें मोहनीय कर्माचें कार्य म्हणजे मोहनीय कर्मापासून उत्पन्न होणारी अशी

असल्यानें तीर्थकराचे ठिकाणीं तिचें अस्तित्व असणें मुळींच शक्य नाहीं. म्हणून तो वीतराग आहे असें सिद्ध होतें. अर्थात् तीर्थंकर असा आत्मा वंदनीय आहे असेंहि सिद्ध होतें. आतां त्या भगवंताच्या 'उच्चार केल्यावांचून उत्पन्न होणाऱ्या' दिव्यध्वनीचें वैभव उत्कर्ष पावत आहे असें दुसरें त्या आत्म्याचें (तीर्थकरविभूचें) विशेषण आहे. ह्याचें तात्पर्य असें आहे कीं, तीर्थकरांनीं मनोयोग आणि वचनयोग ह्यांचा त्याग केल्यावर त्यांच्या इच्छेवांचून आणि तालु, ओष्ठ वगैरे स्थानांच्या चलनावांचून त्यांच्या शरीरांतून भव्यजीवांच्या कल्याणाकरितां दिव्यध्वनि उत्पन्न होत असतो. तो दिव्यध्वनि भव्यजीवांना कल्याणमार्गाचा उपदेश करीत असतो. अर्थात् हा उपदेश श्रोतृजनांच्या मनांत यथार्थ बिंबणें हेंच त्या दिव्यध्वनीचें वैभव होय. हें वैभव 'उत्कर्ष पावत आहे' म्हणजे निर्बाधपणें भव्यजीवांचें कल्याण करीत आहे; तेव्हां अशा वाग्वैभवानें युक्त असलेला आत्मा वंदनीय आहे, हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. असो. हा तीर्थकरात्मा परमसौख्य किंवा परमकल्याण असें जें निर्वाण म्हणजे मोक्ष, त्याला प्राप्त झाला असल्यानें तो शिवस्वरूप कल्याणरूपी आहे. तो जगाला सन्मार्गोपदेश करून सर्वजीवांचा उद्धार करीत असल्यामुळें "धाता (सदुपदेश करणारा) आहे. तो

ज्याचें ज्ञान यथार्थ आहे असा असल्यामुळें अथवा ज्याचें मोक्षगमन पुनः भवप्राप्तीला कारणीभूत नव्हे असें असल्यामुळें सुगत आहे. आणि तोच विष्णु म्हणजे आपल्या केवलज्ञानानें लोकालोकांतील सर्व वस्तूंना व्यापणारा असा आहे. ह्या प्रकारच्या गुणांनीं युक्त असलेला जो सकलात्मा [ शरीरधारी आत्मा ], तो वंद्य असल्यामुळें त्याला आचार्यांनीं आपली इष्टदेवता कल्पून प्रणाम केला आहे.

ननु निष्कलेतररूपमात्मानं नत्वा भवान्किं करिष्यतीत्याह—

श्रुतेन लिंगेन यथात्मशक्ति ।
समाहितान्तःकरणेन सम्यक् ॥
समीक्ष्य कैवल्यसुखस्पृहाणां ।
विविक्तमात्मानमथाभिधास्ये ॥ ३ ॥

टीका—अथ इष्टदेवतानमस्कारकरणानन्तरं । अभिधास्ये कथयिष्ये । कं ? विविक्तमात्मानं कर्ममलरहितं जीवस्वरूपं । कथमभिधास्ये ? यथाशक्ति आत्मशक्तेरनतिक्रमेण । किं कृत्वा ? समीक्ष्य तथाभूतमात्मानं सम्यग्ज्ञात्वा । केन ? श्रुतेन—एको मे सासओ अप्पा णाणदंसणलक्खणो । सेसा मे बाहिरा भावा सव्वे संजोगलक्खणा ॥ इत्याद्यागमेन । तथा लिङ्गेन हेतुना । तथाहि शरीरादिरात्मभिन्नो भिन्नलक्षणलक्षितत्वात् । ययोर्भिन्नलक्षणलक्षितत्वं तयोर्भेदो यथा जलानलयोः । भिन्नलक्षणलक्षितत्वं चात्मशरीरयोरिति ॥ न चानयोर्भिन्नलक्षणलक्षितत्वमप्रसिद्धं,

आत्मन उपयोगस्वरूपोपलक्षितत्वात्, शरीरादेस्तद्विपरीतत्वात् । समाहितान्तःकरणेन समाहितमेकाग्रीभूतं तच्च तदन्तःकरणं च मनस्तेन । सम्यक् समीक्ष्य सम्यग्ज्ञात्वा अनुभूयेत्यर्थः । केषां तथाभूतमात्मानमभिधास्ये ? कैवल्यसुखस्पृहाणां कैवल्ये सकलकर्मरहितत्वे सति सुखं तत्र स्पृहा अभिलाषो येषां, कैवल्ये विषयाप्रभवे वा सुखे; कैवल्यसुखयोः स्पृहा येषाम् ॥

अर्थ—ह्याप्रमाणें माझ्या इष्टदेवता असे जे निष्कलात्मा [ शरीररहित असा सिद्धात्मा ] आणि सकलात्मा ( शरीरसहित असा अर्हत्परमेष्ठी ) ह्या दोघांनाहि नमस्कार करून; शास्त्र, अनुमान आणि माझें एकाग्र अंतःकरण ह्यांच्या योगानें चांगल्या रीतीनें विचार करून, कैवल्यसुखाची ( कैवल्य प्राप्त झाल्यानंतर म्हणजे कर्मबंध सुटल्यानंतर होणाऱ्या सुखाची अथवा कैवल्यसुखाची म्हणजे विषयांपासून उत्पन्न न झालेल्या सुखाची किंवा केवलज्ञान आणि सुख ह्या दोहोंची ) इच्छा करणाऱ्या भव्यजीवांना कर्ममलरहित अर्थात् शुद्ध असें जीवस्वरूप यथाशक्ति मी सांगतों. ह्या ठिकाणीं जीवाच्या वास्तवस्वरूपाविषयीं अनुमानानें जो विचार करावयाचा त्याचा प्रकार असा—शरीरादि वस्तूंचा समुदाय आत्म्याहून भिन्न आहे, कारण, आत्म्याच्या लक्षणाहून भिन्न अशा लक्षणानें तो युक्त आहे म्हणून ह्यांत शरीरादिवस्तुसमूहाच्या ठिकाणीं

आत्मभिन्नत्वाचें अनुमान केलें आहे; आणि 'आत्म्याच्या लक्षणाहून भिन्न अशा लक्षणानें युक्त असणें' हा हेतु आहे. ज्यांचीं ज्यांचीं भिन्नलक्षणें असतात ते ते दोघे एकमेकांहून भिन्न असतात. उदाहरण:-उदक आणि अग्नि हे दोन भिन्न-लक्षणाचे असल्यानें ते दोघे एकमेकांहून अगदींच भिन्न आहेत. त्याप्रमाणेंच आत्मा आणि शरीरादि वस्तूंचा समूह हे दोन भिन्नलक्षणांनीं युक्त असल्यामुळें एकमेकांहून अगदींच भिन्न आहेत हें सिद्ध होतें. शास्त्रांत आत्म्याचें दर्शन आणि ज्ञान हें लक्षण सांगितलेलें असल्यामुळें, "आत्मा आणि शरीरादि-वस्तूंचा समूह ह्यांचीं भिन्न लक्षणें अप्रसिद्ध आहेत" अशी शंका करण्याचें प्रयोजन उरलें नाहीं. ह्या प्रकारचें अनुमान आणि शास्त्र ह्यांचा एकाग्रमनानें विचार करून जीवात्म्याचें जें स्वरूप वास्तव आहे असें मला वाटतें तें मी सांगतों, अशी आचार्यांनीं ह्या श्लोकांत प्रतिज्ञा केली आहे. टीकेंतील भावार्थहि ह्यांतच आलेला असल्यामुळें त्याबद्दल निराळें लिहिलें नाहीं.

कतिभेद: पुनरात्मा भवति ? येन विविक्तमात्मानमिति विशेष उच्यते । इत्याशङ्क्याह—

बहिरन्तः परश्चेति त्रिधाऽऽत्मा सर्वदेहिषु ॥
उपेयात्तत्र परमं मध्योपायाद्बहिस्त्यजेत् ॥ ४ ॥

टीका।—बहिर्बहिरात्मा, अन्तरन्तरात्मा, परश्च परमात्मा इति त्रिधा आत्मा त्रिप्रकार आत्मा। क? सर्वदेहिषु सकलप्राणिषु। ननु अभव्येषु बहिरात्मन एव सम्भवात् कथं सर्वदेहिषु त्रिधाऽऽत्मा स्यात्? इत्यप्यनुपपन्नं; तत्रापि द्रव्यरूपतया त्रिधात्मसद्भावोपपत्तेः। कथं पुनस्तत्र पञ्चज्ञानावरणान्युपपद्यन्ते? केवलज्ञानाद्याविर्भावसामग्री हि तत्र कदाऽपि न भविष्यतीत्यभव्यत्वं न पुनः, तद्योग्यद्रव्यस्याभावादिति॥ भव्यराश्यपेक्षया वा सर्वदेहिग्रहणं। आसन्नदूरदूरतरभव्येषु अभव्यसमानभव्येषु च सर्वेषु त्रिधाऽऽत्मा विद्यत इति॥ तर्हि सर्वज्ञे परमात्मन एव सद्भावाद्बहिरन्तरात्मनोरभावात्त्रिधात्मनो विरोध इत्यप्ययुक्तम्। भूतप्रज्ञापननयापेक्षया तत्र तद्विरोधासिद्धेः घृतघटवत्। यो हि सर्वज्ञावस्थायां परमात्मा सम्पन्नः स पूर्वं बहिरात्मा अन्तरात्मा चासीदिति। घृतघटवदन्तरात्मनोऽपि बहिरात्मत्वं परमात्मत्वं च भूतभाविप्रज्ञापननयापेक्षया द्रष्टव्यम्॥ तत्र कुतः कस्योपादानं कस्य वा त्यागः कर्तव्य इत्याह—उपेयादिति। तत्र तेषु त्रिधात्मसु मध्ये। उपेयात् स्वीकुर्यात्। परमं परमात्मानं। कस्मात्? मध्योपायात् मध्योऽन्तरात्मा स एवोपायस्तस्मात्। तथा बहिः बहिरात्मानं मध्योपायादेव त्यजेत्॥

अर्थ—सर्व जीवांच्या ठिकाणीं बहिरात्मा, अन्तरात्मा आणि परमात्मा असा तीन प्रकारचा आत्मा आहे. त्यांत अंतरात्म्याच्या साहाय्यानें परमात्म्याचें ग्रहण करावें; म्हणजे जीवानें आपण अंतरात्मा होऊन परमात्मरूप व्हावें. आणि त्या अंतरात्म्याच्याच साहाय्यानें बहिरात्म्याचा त्याग करावा; म्हणजे आपलें बहिरात्मत्व सोडून द्यावें.

भावार्थ—मागील श्लोकांत "शुद्धात्म्याचें स्वरूप सांगतों" असें सांगितलें असल्यानें, आत्मा किती प्रकारचा आहे हें समजावें अशी इच्छा श्रोत्याला होते. म्हणून ह्या श्लोकांत आचार्यांनीं आत्म्याचे भेद सांगितले आहेत. आत्मा हा बहिरात्मा, अंतरात्मा आणि परमात्मा असा तीन प्रकारचा असून ते आत्म्याचे तीनही प्रकार सर्व जीवांच्या ठिकाणीं आहेत. ह्या ठिकाणीं तीनहि प्रकारचे आत्मे सर्व जीवांच्या ठिकाणीं आहेत, असें म्हटल्यामुळें; अभव्यजीव हा फक्त बहिरात्माच असल्यानें त्याच्या आत्म्याचे तीन प्रकार संभवत नाहींत, अशी शंका सहजच उत्पन्न होते. परंतु ह्या शंकेत कांहींच अर्थ नाहीं. कारण, अभव्यजीवांच्या ठिकाणींहि आत्मद्रव्य असल्यानें द्रव्यरूपानें तीनहि आत्मे आहेत असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. असें जर नसतें, तर, अभव्यजीवाच्या ठिकाणीं जें ज्ञानावरणीय कर्म आहे, तें केवलज्ञान वगैरे पांचही प्रकारच्या ज्ञानाचें आवरण करणारें आहे हें म्हणणें जुळलें नसतें. हें म्हणणें तरी, केवलज्ञान होण्याला योग्य असें आत्मद्रव्य अभव्यजीवाच्या ठिकाणीं असल्यामुळेंच जुळतें आहे. बरें, आज ज्याला आपण अभव्यजीव म्हणत आहोंत, त्याच्या ठिकाणीं केवलज्ञान प्रकाशित करणारी सामग्री केव्हांच उत्पन्न व्हावयाची नाहीं, म्हणून त्यांना अभव्य म्हणावयाचें, असेंही म्हणतां येत नाहीं.

कारण, केवलज्ञान उत्पन्न होण्याला योग्य असें द्रव्य अभव्य-जीवाच्या ठायीं आहे; म्हणून अभव्यजीवाच्या ठिकाणींही तीन प्रकारचा आत्मा आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. किंवा ह्या वरील शंकेचें समाधान दुसऱ्या प्रकारानेंही करतां येतें. तें असें—ह्या ठिकाणीं सर्वजीव म्हणजे भव्यराशि असा अर्थ करावा. म्हणजे आसन्नभव्य, दूरभव्य, दूरतरभव्य आणि अभव्यसमानभव्य हे सर्व जीव भव्यराशीपैकींच असल्यानें ह्यांच्या ठिकाणीं तीनहि प्रकारचा आत्मा आहे ही गोष्ट निर्बाध सिद्ध होते. ह्याप्रमाणें वरील शंकेचें निरसन जरी होतें आहे, तथापि दुसरी एक शंका येते. ती अशी कीं, जे जीव सर्वज्ञ झाले आहेत, त्यांच्या ठिकाणीं फक्त एक परमात्माच असल्यानें बहिरात्मा आणि अंतरात्मा ह्यांचा त्यांच्या ठिकाणीं अभाव येतो. त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं तीन प्रकारचा आत्मा नाहीं असें म्हणावें लागतें. ह्याप्रमाणें शंका जरी येते आहे, तथापि तीही जुळत नाहीं. कारण—असें समजा कीं, तूप घालण्याकरितां एक घागर तयार केली; तिला त्यांत तूप घालण्याच्या पूर्वींही आपण "तुपाची घागर" असेंच म्हणतों; व त्यांत तूप घातल्यानंतर व तूप ओंतून घेतल्यानंतरहि आम्ही तिला "तुपाची घागर" असेंच म्हणत असतों. त्यांतून तूप ओंतून घेतल्यानंतर ज्याप्रमाणें भूतपूर्वनयाच्या अपेक्षेनें आम्ही तिला तुपाची घागर असें

म्हणत असतों, त्याप्रमाणेंच जो जीव आज आपलें अंतरात्मत्व टाकून सर्वज्ञ झाल्यामुळें परमात्मा झाला आहे, तो पूर्वी म्हणजे सर्वज्ञ होण्याच्या पूर्वी अंतरात्मा असल्यामुळें आज परमात्मस्वरूपानें परिणत झालेल्या आत्म्यालाच भूतपूर्व-नयाच्या अपेक्षेनें अंतरात्मा म्हणतां येतें. अर्थात् परमात्मा हाच भूतपूर्वनयापेक्षेनें अंतरात्मा आहे असें सिद्ध होतें. तसेंच आज परमात्मस्वरूप असलेला जीव अंतरात्मा होण्याच्या पूर्वी बहिरात्मस्थितींत असल्यामुळें वरील नयाच्या अपेक्षेनें त्यालाच बहिरात्माहि म्हणतां येतें. तसेंच आज जो अंतरात्मा तोहि भूतपूर्वनयाच्या अपेक्षेनें बहिरात्मा होतो. ह्याप्रमाणें भूतपूर्वनयापेक्षेनें सर्वज्ञ परमात्म्यालाहि त्रिविधत्व येतें असें समजावें. आतां आज जो जीव अंतरात्मस्वरूप आहे, त्याचें त्रिविधत्व कसें मानावें ह्याबद्दल थोडेंसें विवरण करतों ज्याप्रमाणें तूप घालण्याकरितां तयार केलेल्या घागरींत पुढें तूप घालावयाचें असल्यामुळें आजही आपण तिला तुपाची घागर असेंच म्हणतों, त्याप्रमाणें अंतरात्मा हा पुढें परमात्मा व्हावयाचा असल्यामुळें भाविप्रज्ञापननयाच्या अपेक्षेनें आजही त्याला परमात्मा असें म्हणतां येतें; आणि वर सांगितल्याप्रमाणें भूतपूर्वनयाच्या अपेक्षेनें अंतरात्म्याला बहिरात्मा असेंहि म्हणतां येतें; ह्यामुळें अंतरात्मा हा भूतपूर्व-नयाच्या अपेक्षेनें बहिरात्मा आहे, व भाविप्रज्ञापननयाच्या

अपेक्षेनें तो परमात्मा आहे, म्हणून त्याच्या ठिकाणींहि आत्म्याचें त्रिविधत्व संभवतें असें समजावें. (ह्या ठिकाणीं भाविप्रज्ञापननय म्हणजे पुढें होणाऱ्याच्या अपेक्षेनें आज व्यवहार करणें असें समजावें. जसें तुपाच्या घागरींत तूप घालावयाच्या पूर्वींही पुढें तूप घालावयाचें आहे ह्या अपेक्षेनें तिला तुपाची घागर असें म्हणतों त्याप्रमाणें.) असो! ह्याप्रमाणें सर्वजीवात्म्यांचे ठिकाणीं आत्म्याचे तीनही प्रकार असल्यानें आत्मा तीन प्रकारचा आहे हें सिद्ध होतें, असें समजावें. ह्या तीन प्रकारच्या आत्म्यांपैकीं अंतरात्म्याच्या साहाय्यानें परमात्म्याचा स्वीकार करावा. म्हणजे जीवानें आपण अंतरात्मा होऊन परमात्मस्वरूपाची प्राप्ति करून घ्यावी आणि बहिरात्मत्वाचा त्याग करावा.

तत्र बहिरन्तःपरमात्मनां प्रत्येकं लक्षणमाह—

बहिरात्मा शरीरादौ जातात्मभ्रान्तिरान्तरः ॥
चित्तदोषात्मविभ्रान्तिः परमात्माऽतिनिर्मलः ॥ ५ ॥

टीका—शरीरादौ शरीरे आदिशब्दाद्वाङ्मनसोरेव ग्रहणं तत्र जाता आत्मेति भ्रान्तिर्यस्य स बहिरात्मा भवति । आन्तरः अन्तर्भवः । तत्र भव इत्यणष्टेर्भमात्रे टिलोपमित्यस्यानित्यत्वं येषां च विरोधः शाश्वतिक इति निर्देशात् । अन्तरे वा भव आन्तरोऽन्तरात्मा । स

कथम्भूतो भवति ? चित्तदोषात्मविभ्रान्तिः चित्तं च विकल्पो, दोषाश्च रागादयः, आत्मा च शुद्धं चेतनाद्रव्यं तेषु विगता विनष्टा भ्रान्तिर्यस्य । चित्तं चित्तत्वेन बुध्यते, दोषांश्च दोषत्वेन, आत्मानमात्मत्वेनेत्यर्थः । चित्तदोषेषु वा विगता आत्मेति भ्रान्तिर्यस्य । परमात्मा भवति । किं विशिष्टः ? अतिनिर्मलः प्रक्षीणाशेषकर्ममलः ॥

अर्थ—शरीरादिकांच्या ठिकाणीं ज्याला आत्मत्वाचा भ्रम झाला आहे, म्हणजे जो शरीर, वाणी आणि मन ह्यांनाच आत्मा असें समजत आहे, तो बहिरात्मा होय. मन, रागादि दोष आणि आत्मा ह्यांच्या विषयींची भ्रान्ति नाहींशी झाली आहे, म्हणजे जो हे तिन्ही पदार्थ एकमेकांहून अगदीं निराळे आहेत असें निश्चयानें समजतो अर्थात् जो आत्म्यालाच आत्मा असें समजतो, मनालाच मन असें मानतो आणि दोषांनाच दोषत्वेंकरून जाणतो; अथवा चित्ताचे दोष असे जे रागादिविकार त्यांच्या ठिकाणीं ज्या आत्मत्वाची भ्रांति होत नाहीं; कारण, आत्मा हें चेतनद्रव्य आहे असें ज्याला माहीत आहे; तो अन्तरात्मा होय. आणि जो अतिनिर्मळ म्हणजे ज्याचा कर्ममल नष्ट झाला आहे तो परमात्मा होय. टीकाकाराचा अभिप्राय ह्यांत आला आहे.

तद्वाचिकां नाममालां दर्शयन्नाह—

निर्मलः केवलः शुद्धो विविक्तः प्रभुरव्ययः ॥
परमेष्ठी परात्मेति परमात्मेश्वरो जिनः ॥ ६ ॥

टीका– निर्मलः कर्ममलरहितः । केवलः शरीरादीनां सम्बन्धरहितः । शुद्धः द्रव्यभावकर्मणामभावात्परमविशुद्धिसमन्वितः । विविक्तः शरीरकर्मादिभिरसंस्पृष्टः । प्रभुरिन्द्रादीनां स्वामी । अव्ययो लब्धानन्तचतुष्टयस्वरूपादप्रच्युतः । परमेष्ठी परमे इन्द्रादिवन्द्ये पदे तिष्ठतीति परमेष्ठी स्थानशीलः । परात्मा संसारीजीवेभ्य उत्कृष्ट आत्मा । इति शब्दः प्रकारार्थे । एवं प्रकारा ये शब्दास्ते परमात्मनो वाचकाः । परमात्मेत्यादिना तानेव दर्शयति । परमात्मा सकलप्राणिभ्य उत्तम आत्मा । ईश्वरः इन्द्राद्यसम्भाविना अन्तरङ्गबहिरङ्गेण परमैश्वर्येण सदैव सम्पन्नः । जिनः सकलकर्मोन्मूलकः

अर्थ– परमात्मा ह्या अर्थाचे वाचक शब्द ह्या श्लोकांत आचार्य सांगतात. त्या परमात्म्याला तो कर्ममलानें रहित असल्यानें निर्मल म्हणतात. त्याला शरीरादिकांचा संबंध नसल्यामुळें केवल असें म्हणतात. द्रव्यकर्म आणि भावकर्म ह्या दोहोंचाही त्याच्या ठिकाणीं अभाव असल्यानें तो अत्यंत शुद्धतेनें युक्त असल्यामुळें त्याला शुद्ध असें नांव आहे. शरीर, कर्में वगैरे त्याला स्पर्शही करूं शकत नाहींत म्हणून त्याला विविक्त ( निराळा ) असें म्हणतात. तो इंद्रादि देवांचा स्वामी असल्यामुळें त्याला प्रभु असें म्हणतात. अनंतचतुष्टयात्मक स्वरूपाची प्राप्ती झाली असतां त्या स्वरूपापासून तो केव्हांही ढळत नाहीं म्हणून त्याला अच्युत असें नांव आहे. इंद्रादि देवांना वंद्य अशा स्थानावर म्हणजे मोक्षशिलेवर निरंतर

रहाणारा असल्यामुळें त्या परमात्म्याला परमेष्ठी असें म्हणतात. तो संसारी आत्म्याहून उत्कृष्ट असा आत्मा असल्यानें त्याला परात्मा असें म्हणतात. संपूर्ण प्राण्यापेक्षां उत्तम अशा प्रकारचा आत्मा असल्यानें त्याला परमात्मा असें म्हणतात. इंद्रादिकांनाही न मिळणाऱ्या अशा अंतरंग आणि बहिरंग अशा ऐश्वर्यानें तो सर्वदा युक्त असल्यामुळें त्याला ईश्वर म्हणतात. आणि आठही प्रकारच्या कर्मांचा नाश करणारा असा असल्यामुळें त्यालाच जिन असेंही म्हणतात. अर्थात्— निर्मळ, केवल, शुद्ध, विविक्त, प्रभु, अव्यय, परमेष्ठी, परात्मा, परमात्मा, ईश्वर आणि जिन हीं अकरा नांवें परमात्म्याचीं आहेत, असें समजावें.

इदानीं बहिरात्मनो देहस्यात्मत्वेनाध्यवसाये कारण-मुपदर्शयन्नाह—

बहिरात्मेन्द्रियद्वारैरात्मज्ञानपराङ्मुखः ॥
स्फुरितः स्वात्मनो देहमात्मत्वेनाध्यवस्यति ॥ ७ ॥

टीका- इन्द्रियद्वारैरिन्द्रियमुखैः कृत्वा स्फुरितो बहिरर्थग्रहणे व्यापृतः सन् बहिरात्मा मूढात्मा । आत्मज्ञानपराङ्मुखो जीवस्वरूपज्ञा-नाद्बहिर्भूतो भवति । तथाभूतश्च सन्नसौ किं करोति ? स्वात्मनो देहमा-त्मत्वेनाध्यवस्यति आत्मीयशरीरमेवाहमिति प्रतिपद्यते ॥

अर्थ- ह्या श्लोकांत बहिरात्म्याला 'देह हाच मी आहे' असें जें वाटतें, त्याचें कारण सांगतात. अज्ञानी असा हा बहिरात्मा, इंद्रियांच्या द्वारानें बाह्य जे शब्दस्पर्शादि विषय त्यांचें ग्रहण करण्यांत गुंतून राहिल्यामुळें स्वतःचें खरें स्वरूप जाणण्याविषयीं पराङ्मुख होतो. त्यामुळें आपलें असें जें हें शरीर त्याला तो 'मी' असें समजूं लागतो. म्हणजे विषयांचें ग्रहण करणारा मी आहे, असें वाटावयाचें राहून त्याला विषयांच्या ग्रहणाचें साधन जें शरीर तेंच मी आहे असें वाटूं लागतें. ह्याप्रमाणें जीव विषयग्रहण करण्यांत गढून गेल्यामुळें त्याला देहच मी असा भ्रम झाला आहे.

तच्च प्रतिपद्यमानो मनुष्यादिचतुर्गतिसम्बन्धिशरीरमभेदेन प्रतिपद्यते तत्र—

नरदेहस्थमात्मानमविद्वान् मन्यते नरम् ॥
तिर्यञ्चं तिर्यगङ्गस्थं सुराङ्गस्थं सुरं तथा ॥ ८ ॥

टीका—नरस्य देहो नरदेहः तत्र तिष्ठतीति नरदेहस्थस्तमात्मानं नरं मन्यते । कोऽसौ ? अविद्वान् बहिरात्मा ॥ तिर्यञ्चमात्मानं मन्यते । कथम्भूतं ? तिर्यगङ्गस्थं तिरश्चामङ्गं तिर्यगङ्गं तत्र तिष्ठतीति तिर्यगङ्ग-स्थस्तं । सुराङ्गस्थं सुरं तथा मन्यते ॥

अर्थ—तो बहिरात्मा विषयग्रहण करीत असतां मनुष्यादिचतुर्विंद गतींत प्राप्त झालेल्या शरीरालाच मीपणानें मानत असतो. त्यांत तो अज्ञानी असा बहिरात्मा मनुष्य-शरीरांत असलेल्या आपल्यालाच मनुष्य असें समजतो. तिर्यक् म्हणजे पश्वादिक, त्यांच्या शरीरांत असलेल्या आपल्याला पशु वगैरे असेंच समजतो. आणि देवशरीरांत असलेल्या आपल्याला देव असें समजतो.

**नारकं नारकाङ्गस्थं न स्वयं तत्त्वतस्तथा ॥**
**अनन्तानन्तधीशक्तिः स्वसंवेद्योऽचलस्थितिः ॥ ९ ॥**

टीका:—नारकमात्मानं मन्यते । किंविशिष्टं ? नारकाङ्गस्थं । न स्वयं तथा नरादिरूप आत्मा स्वयं कर्मोपाधिमन्तरेण न भवति । कथं ? तत्त्वतः परमार्थतो न भवति । व्यवहारेण तु यदा भवति तदा भवतु, कर्मोपाधिकृता हि जीवस्य मनुष्यादिपर्यायास्तन्निवृत्तौ निवर्तमान-त्वात्, पुनर्वास्तवा इत्यर्थः । परमार्थतस्तर्हि कीदृशोऽसावित्याह—अनन्तानन्तधीशक्तिः धीश्च शक्तिश्च धीशक्ती, अनन्तानन्ते धीशक्ति यस्य । तथाभूतोऽसौ कुतः परिच्छेद्य इत्याह—स्वसंवेद्यः निरुपाधिकं हि रूपं वस्तुनः स्वभावोऽभिधीयते । कर्माद्यपाये चानन्तानन्तधीशक्तिपरिणत आत्मा स्वसंवेदनेनैव वेद्यः । तद्विपरीतपरिणत्यनुभवस्य संसारावस्थायां कर्मोपाधिनिर्मितत्वात् ॥ अस्तु नाम तथास्वसंवेद्यः कियत्कालमसौ । नतु सर्वदा ! पश्चात्तद्रूपविनाशादित्याह— अचलस्थितिः अनन्तानन्तधी-

शक्तिस्वभावेनाचला स्थितिर्यस्य सः ॥ यैः पुनर्योगसांख्यैर्मुक्तौ तत्प्रच्युतिरात्मनोऽभ्युपगता ते प्रमेयकमलमार्तण्डे न्यायकुमुदचन्द्रे च मोक्षविचारे विस्तरतः प्रत्याख्याताः ॥

अर्थ—तसेंच जेव्हां आत्मा हा नरकांतील देहांत असतो तेव्हां तो आपल्यालाही नारकच मानतो. परंतु, खरा विचार केला असतां तो तसा नसतो. म्हणजे कर्मोपाधि असल्यावांचून आत्म्याला मनुष्यादिपर्यायांची प्राप्ति होत नसल्यामुळें तो वास्तविकपणें मनुष्यादिरूपाचा नाहीं. अर्थात् निश्चयनयाच्या अपेक्षेनें आत्मा मनुष्य वगैरे रूपाचा नाहीं. आतां व्यवहारनयाच्या अपेक्षेनें तो जरी मनुष्यादिरूपाचा असला तथापि तें त्याचें खरें स्वरूप नव्हे. कारण, आत्म्याला जे हे मनुष्यादिपर्याय प्राप्त होतात ते फक्त कर्मोपाधीच्या निमित्तानेंच प्राप्त होत असल्यानें त्या कर्मांची निवृत्ति झाली म्हणजे अर्थातच त्या मनुष्यादि पर्यायांचीही निवृत्ति होते; आणि त्याचें खरें स्वरूपच रहातें. वास्तविक पाहिलें असतां आत्मा हा अनंतानंतधीशक्ति म्हणजे ज्याची केवलज्ञानरूपी शक्ति, अनंतानंत म्हणजे अपरिमित आहे, अथवा ज्याचें ज्ञान व वीर्य हीं अपरिमित आहेत असा आहे. कारण, निरुपाधि असें जें वस्तूचें स्वरूप असेल तो त्या वस्तूचा स्वभाव होय. असें असल्यामुळें कर्मरूपी उपाधीपासून मुक्त झालेल्या आत्म्याचें जें स्वरूप असेल तो त्याचा स्वभाव म्हणजे

वास्तविक स्वरूप असें म्हणणें योग्य आहे. तें आत्म्याचें स्वरूप तो कर्मोपाधिपासून मुक्त झाला म्हणजे त्याच्या ठिकाणीं उपलब्ध होत असल्यामुळें आत्मा हा अनंतानंतधीशक्ति असा आहे असेंच म्हणावें लागतें. आतां हें आत्म्याचें स्वरूप कसें समजावयाचें? असा एक प्रश्न ह्या ठिकाणीं उपस्थित होतो; त्याचें उत्तर आचार्य सांगतात—तो आत्मा स्वसंवेद्य आहे म्हणजे वर जें आत्म्याचें वास्तवस्वरूप सांगितलें आहे, तें स्वसंवेद्य म्हणजे स्वतःच जाणण्याला योग्य असें आहे. अर्थात् तें स्वतःलाच प्रत्यक्ष होणारें असल्यानें त्याबद्दल दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची अपेक्षा नाहीं असें आहे. ह्या वेळीं ह्या संसारांत आत्मा हा कर्मोपाधीमुळें उत्पन्न झाला असल्यानें त्याच्या ठिकाणीं अनंतानंतधीशक्ति ह्या त्याच्या खऱ्या स्वरूपाची जरी आपल्याला आज उपलब्धि होत नाहीं, तथापि कर्मरूपी उपाधीचा नाश झाल्यावर तें त्याचें त्यालाच कळूं लागतें. कारण अनंतानंतधीशक्ति ह्या स्वभावानें आत्म्याची अचलस्थिति असते. म्हणजे त्याला कर्मोपाधि जाऊन एकदां स्वरूपप्राप्ति झाली म्हणजे तो त्या स्वरूपापासून केव्हांच ढळत नाहीं. आतां अन्यमती जे सांख्य आणि तार्किक ह्यांनीं मोक्षावस्थेंत आत्म्याच्या स्वरूपाची च्युति होते (त्यांनीं आत्म्याचे ज्ञानादिगुण नष्ट होणें ह्यालाच मोक्ष मानिलें आहे) असें जरी मानिलें आहे; तथापि त्यांच्या त्या

म्हणण्याचें खंडन प्रमेयकमलमार्तंड, न्यायकुमुदचंद्र ह्या ग्रथांत मोक्षविचाराच्या प्रसंगीं विस्तारानें केलें असल्यामुळें ह्या ठिकाणीं त्याबद्दल कांहीं सांगावयाचें कारण नाहीं.

स्वदेह एवमध्यवसायं कुर्वाणो बहिरात्मा परदेहे कथम्भूतं करोतीत्याह—

स्वदेहसदृशं दृष्ट्वा परदेहमचेतनम् ॥
परात्माधिष्ठितं मूढः परत्वेनाध्यवस्यति ॥ १० ॥

टीका—व्यापारव्याहाराकारादिना स्वदेहसदृशं परदेहं दृष्ट्वा । कथम्भूतं? परात्माधिष्ठितं कर्मवशात्स्वीकृतं । अचेतनं चेतनेन सङ्गतं । मूढो बहिरात्मा । परत्वेनापरमात्मत्वेन । अध्यवस्यति ॥

अर्थ—आपला संबंध ज्या देहाशीं झाला आहे तो देहच मी असें समजणारा हा बहिरात्मा परकीयाच्या देहाविषयीं काय मानतो तें सांगतात—परमात्म्यानें कर्माच्या स्वाधीन होऊन ग्रहण केलेला, अचेतन असा दुसऱ्याचा देह; क्रिया, बोलणें आणि आकृति ह्यांच्या योगानें आपल्यासारखा पाहून अज्ञानी असा हा बहिरात्मा, त्या देहालाच 'हा एक दुसरा आत्मा आहे' असें समजतो.

एवंविधाध्यवसायात्किं करोतीत्याह—

स्वपराध्यवसायेन देहेष्वविदितात्मनाम् ॥
वर्तते विभ्रमः पुंसां पुत्रभार्यादिगोचरः ॥ ११ ॥

टीका—विभ्रमो विपर्यासः पुंसां वर्तते । किं विशिष्टानां? अविदितात्मनां अपरिज्ञातात्मस्वरूपाणां । केन कृत्वाऽसौ वर्तते? स्वपराध्यवसायेन । क्व? देहेषु । कथम्भूतो विभ्रमः? पुत्रभार्यादिगोचरः परमार्थतोऽनात्मीयमनुपकारकमपि पुत्रभार्याधनधान्यादिकमात्मीयमुपकारकं च मन्यते । तत्सम्पत्तौ सन्तोषं तद्वियोगे च महासन्तापमात्मवधादिकं च करोति ॥

अर्थ—वरील प्रकारच्या समजुतीनें हा बहिरात्मा काय करतो तें सांगतात—ज्यांना आपल्या स्वरूपाचें ज्ञान नाहीं अशा पुरुषांना मी आणि दुसरा अशा वरील श्लोकांत सांगितलेल्या समजुतीनें त्या त्या देहांचे ठिकाणीं हा पुत्र, ही भार्या, ही कन्या, वगैरे प्रकारचा भ्रम होतो. तात्पर्य—वास्तविक विचार केला असतां पुत्र, भार्या, धन, धान्य वगैरे हे आपले नसून व आपल्यावर कोणत्याही प्रकारचा उपकार करणारे असे सुद्धां नाहींत; असें असूनही हे अज्ञानी जीव त्यांना आपले आणि आपल्यावर उपकार करणारे असे मानतात. त्यांच्या प्राप्तीनें संतोष मानतात. त्यांच्या वियोगानें दुःख करूं लागतात; मोठा संताप करून घेतात. अधिक काय! पण त्यांच्याकरितां आत्महत्यादिक व्यापारही करतात!

एवंविधविभ्रमाच्च किं भवतीत्याह—

अविद्यासञ्ज्ञितस्तस्मात्संस्कारो जायते दृढः ॥
येन लोकोऽङ्गमेव स्वं पुनरप्यभिमन्यते ॥ १२ ॥

टीका—तस्माद्विभ्रमाद्बहिरात्मनि संस्कारो वासना दृढोऽविचलो जायते। किन्नामा? अविद्यासञ्ज्ञितः अविद्या सञ्ज्ञाऽस्य सञ्जातेति 'तारकादिभ्य इतच्'। येन संस्कारेण कृत्वा लोकोऽविवेकिजनः। अङ्गमेव च शरीरमेव। स्वं आत्मानं पुनरपि जन्मान्तरेऽपि। अभिमन्यते॥

अर्थ—वर दाखविलेल्या प्रकारच्या भ्रमापासून काय होतें तें सांगतात—त्या भ्रमापासून त्या बहिरात्म्याला एक प्रकारचा अविद्या नांवाचा दृढ (बळकट, सहज घालवितां न येण्यासारखा) संस्कार उत्पन्न होतो. तो संस्कार असा आहे कीं, ज्यामुळें हा बहिरात्म्याचा समुदाय (हा संसारी जीवांचा समूह) पुनः अन्य जन्मांत देखील शरीरालाच 'मी' असें मानूं लागतो.

एवमभिमन्यमानश्चासौ किं करोतीत्याह—

देहे स्वबुद्धिरात्मानं युनक्त्येतेन निश्चयात्॥
स्वात्मन्येवात्मधीस्तस्माद्वियोजयति देहिनम्॥ १३॥

टीका—देहे स्वबुद्धिरात्मबुद्धिर्बहिरात्मा। किं करोति? आत्मानं युनक्ति सम्बद्धं करोति दीर्घसंसारिणं करोतीत्यर्थः। केन? एतेन देहेन निश्चयात् परमार्थेन। स्वात्मन्येव जीवस्वरूपे एव। आत्मधीरन्तरात्मा। निश्चयाद्वियोजयति असम्बद्धं करोति॥

अर्थ—ह्याप्रमाणें देहालाच मी असें समजणारा असा हा बहिरात्मा ह्या भ्रमामुळें काय करतो तें सांगतात—देहाच्या ठिकाणीं ज्याला आत्मा अशी बुद्धि झाली आहे असा बहिरात्मा त्या आत्म्याला ( आपल्याला ) देहाशींच संबद्ध करतो. म्हणजे, नेहमीं आपल्याला संसारीच करतो आणि देहावर आत्मबुद्धि न धारण करतां शुद्ध अशा आत्मस्वरूपाच्या ठिकाणींच आत्मबुद्धि धारण करणारा जो अंतरात्मा असतो, तो, आपल्या आत्म्याला त्या संसारापासून मुक्त करतो.

देहेनात्मानं योजयतश्च बहिरात्मनो दुर्विलसितोपदर्शन-पूर्वकमाचार्योऽनुशयं कुर्वन्नाह—

देहेष्वात्मधिया जाताः पुत्रभार्यादिकल्पनाः ॥
सम्पत्तिमात्मनस्ताभिर्मन्यते हा हतं जगत् ॥ १४ ॥

टीका— जाताः प्रवृत्ताः । काः? पुत्रभार्यादिकल्पनाः । क ? देहेषु । कया? आत्मधिया । क? देहेष्वेव । अयमर्थः—पुत्रादिदेहं जीवत्वेन प्रतिपद्यमानस्य मत्पुत्रो भार्येति कल्पनाविकल्पा जायन्ते । ताभिश्चानात्मनीयाभिरनुपकारिणीभिश्च । सम्पत्तिं पुत्रभार्यादिविभूत्यतिशयं । आत्मनो मन्यते । जगत् कर्तृ स्वस्वरूपाद्बहिर्भूतं जगत् । बहिरात्मा प्राणिगणः ॥

अर्थ—आपल्याला संसारी बनविणाऱ्या बहिरात्म्याच्या ह्या दुर्व्यापाराचें प्रदर्शन करून आचार्य ह्याबद्दल आपल्याला

दुःख होत असलेलें दाखवितात—देहाच्या ठिकाणीं मीपणाची बुद्धि झाल्याकारणानें हा पुत्र, ही भार्या इत्यादिक कल्पना झाल्या आहेत. असें असून हा अज्ञानी जीव त्या कल्पनांच्या योगेंकरूनच आपल्याला मोठेपण मानीत आहे. म्हणजे, भार्यापुत्रादिक असले म्हणजे जीवाला 'आपण मोठा भाग्यवान् आहे' असें वाटत असतें. ही फार वाईट गोष्ट आहे! अरेरे! हें सर्व जग नाश पावत आहे! तात्पर्य—हे सर्व जीव आपल्या स्वरूपाविषयीं अज्ञानी झाले असल्यानें सर्वच बहिरात्मे झाले आहेत!!!

इदानीमुक्तमर्थमुपसंहृत्यात्मन्यन्तरात्मनोऽनुप्रवेशं दर्शयन्नाह—

मूलं संसारदुखस्य देह एवात्मधीस्ततः ॥
त्यक्त्वैनां प्रविशेदन्तर्बहिरव्यापृतेन्द्रियः ॥ १५ ॥

टीका- मूलं कारणं । कस्य ? संसारदुःखस्य । काऽसौ ? देह एवात्मधीः देहः कायः स एवात्मधीः । यत एवं ततस्तस्मात्कारणात् । एनां देह एवात्मबुद्धिं । त्यक्त्वा अन्तः प्रविशेत् आत्मबुद्धिं कुर्यात् अन्तरात्मा भवेदित्यर्थः । कथम्भूतः सन् ? बहिरव्यापृतेन्द्रियः बहिर्बाह्यविषयेषु अव्यापृतान्यप्रवृत्तानीन्द्रियाणि यस्य ॥

अर्थ—आतां बहिरात्म्यासंबंधानें जो हा विषय लिहिला आहे तो पुरें करून बहिरात्म्यांत अन्तरात्म्याचा प्रवेश

दाखवितात—देहाच्या ठिकाणीं "हाच आत्मा" अशी जी बुद्धि आहे तीच ह्या संसारांतील दु:खाला कारणीभूत आहे. म्हणून त्या बुद्धीचा त्याग करून जीवानें इंद्रियांना बाह्य वस्तूवर न जाऊं देतां आंत प्रवेश करावा. तात्पर्य–इंद्रियांच्या योगानें बाह्य वस्तूंचें ग्रहण करूं लागल्यामुळेंच आत्म्याला बहिरात्मत्व प्राप्त झालेलें असतें. ह्याकरितां तें टाकून देऊन जीवानें "मी देहेंद्रियादिकांहून निराळा आहे" अशी निश्चयात्मकबुद्धि धारण करावी.

अन्तरात्मा आत्मन्यात्मबुद्धिं कुर्वाणोऽलब्धलाभात्सन्तुष्ट आत्मीयां बहिरात्मावस्थामनुस्मृत्य विषादं कुर्वन्नाह—

**मत्तश्च्युत्वेन्द्रियद्वारैः पतितो विषयेष्वहम् ॥**
**तान् प्रपद्याहमिति मां पुरा वेद न तत्त्वतः ॥ १६ ॥**

**टीका**— मत्तः आत्मस्वरूपात् । च्युत्वा व्यावृत्य । अहं पतितः अत्यासक्त्या प्रवृत्तः । क ? विषयेषु । कैः ? इन्द्रियद्वारैः इन्द्रियमुखैः । ततस्तान् विषयान् प्रपद्य ममोपकारका एते इत्यतिगृद्ध्यानुसृत्य । मां आत्मानं । न वेद न ज्ञातवान् । कथं ? अहमित्युल्लेखेन अहमेवाहं न शरीरादिकमित्येवं तत्वतो न ज्ञातवानित्यर्थः । कदा ? पुरा अनादिकाले ॥

अर्थ—आपल्या खऱ्या स्वरूपाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि करणारा जो अंतरात्मा, तो आजपर्यंत न मिळालेल्या वस्तूचा

लाभ आपल्याला झाल्यामुळें आनंदित होऊन, आपली पूर्वीची जी बहिरात्मावस्था तिचें स्मरण करून दुःख करतो; असें सांगतात—तो अंतरात्मा म्हणतो–मी ह्या इंद्रियांच्या द्वारांनीं आपल्या स्वरूपापासून च्युत होऊन विषयांच्या ठिकाणीं "हेच माझ्यावर उपकार करणारे असें समजून" अतिशय आसक्ति करता झालों. आणि त्या शरीरादि विषयांनाच मीपणानें मानूं लागलों. त्यामुळें मी अनादिकालापासून आपल्या स्वरूपाला जाणता झालों नाहीं.

अथात्मनो ज्ञप्तावुपायं दर्शयन्नाह—

**एवं त्यक्त्वा बहिर्वाचं त्यजेदन्तरशेषतः ॥**
**एष योगः समासेन प्रदीपः परमात्मनः ॥ १७ ॥**

टीका– एवं वक्ष्यमाणन्यायेन । बहिर्वाचं पुत्रभार्याधनधान्यलक्षणान्बहिरर्थवाचकशब्दान् । त्यक्त्वा । अशेषतः साकल्येन । पश्चात् अन्तर्वाचं अहं प्रतिपादकः, प्रतिपाद्यः, सुखी, दुःखी, चेतनो वेत्यादिलक्षणमन्तर्जल्पं । त्यजेदशेषतः । एष बहिरन्तर्जल्पत्यागलक्षणः । योगः स्वरूपे चित्तनिरोधलक्षणः समाधिः । प्रदीपः स्वरूपप्रकाशकः । कस्य ? परमात्मनः । कथं ? समासेन संक्षेपेण झटिति परमात्मस्वरूपप्रकाशक इत्यर्थः ॥

**अर्थ**—आतां आत्मज्ञान होण्याचा उपाय दाखवितात–ह्याप्रमाणें आत्म्याच्या अंतःस्वरूपाकडे प्रवेश केल्यावर मग

बाह्यवाणीचा म्हणजे पुत्र, भार्या, धन, धान्य इत्यादि बाह्यार्थ दाखविणाऱ्या शब्दांचा त्याग करावा. म्हणजे ह्या शब्दाचा केव्हांही उच्चार करूं नये. तसेंच अंतर्वाणीचा म्हणजे मनांत स्फुरद्रूप होणारे जे मी दुःखी आहे, मी सुखी आहे, मी चेतन आहे, अशा प्रकारचे शब्द ह्यांचाही सर्वथा त्याग करावा. ह्याप्रमाणें बाह्यांतर्वाणीचा त्याग करणें ह्यालाच योग म्हणजे चित्तनिरोध मनाला प्रतिबंधित करणें असें म्हणतात. हा योग आत्म्याच्या तात्विक स्वरूपाचें त्वरित ज्ञान करून देणारा आहे.

कुतः पुनर्बहिर्वाचस्त्यागः कर्तव्य इत्याह—

यन्मया दृश्यते रूपं तन्न जानाति सर्वथा ॥
जानन्न दृश्यते रूपं ततः केन ब्रवीम्यहम् ॥ १८ ॥

टीका— रूपं शरीरादिरूपं यद्दृश्यते इन्द्रियैः परिच्छेद्यते मया। तदचेतनत्वादुक्तमपि वचनं सर्वथा न जानाति। जानता च समं वचनव्यवहारो युक्तो नान्येनातिप्रसङ्गात्। यच्च जानद्रूपं चेतनमात्मस्वरूपं तन्न दृश्यते इन्द्रियैर्न परिच्छेद्यते। यत एवं ततः केन सह ब्रवीम्यहम् ॥

अर्थ—वर सांगितलेल्या बाह्यवाणीचा व अंतर्वाणीचा त्याग कां करावा? ह्याबद्दल आचार्य सांगतात—आत्म्यानें असा विचार करावा कीं, मला जें बाह्यस्वरूप म्हणजे

शरीरादिक दिसत आहे, तें अचेतन असल्यामुळें माझें बोलणें मुळींच जाणत नाहीं. ज्याला बोलणें समजतें त्याच्याबरोबरच बोलावयाचें आहे. असें न करतां जर ज्याला बोलणें समजत नाहीं त्याच्याशी देखील आम्ही बोलूं तर भलताच अनर्थ होईल. म्हणून शरीराबरोबर बोलण्याचें कारण राहिलें नाहीं. आतां बोललेलें जाणणारा जो चेतन आत्मा शरीरांत आहे, तो इंद्रियांना दिसत नाहीं. असें असल्यामुळें मी आतां कोणाबरोबर बरें बोलावें ? अर्थात् मुळींच बोलण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. म्हणून बाह्यवाणीचा त्याग करावा.

एवं बहिर्विकल्पं परित्यज्यान्तर्विकल्पं परित्याजयन्नाह—

यत्परैः प्रतिपाद्योऽहं यत्परान् प्रतिपादये ॥
उन्मत्तचेष्टितं तन्मे यदहं निर्विकल्पकः ॥ १९ ॥

टीका– परैरुपाध्यायादिभिरहं यत्प्रतिपाद्यः । परान् शिष्यादीनहं यत्प्रतिपादये तत्सर्वमुन्मत्तचेष्टितं मोहवशादुन्मत्तस्येवाखिलं विकल्पजालात्मक विजृम्भितमित्यर्थः । कुत एतत् ? यदह निर्विकल्पकः यद्यस्मादहमात्मा निर्विकल्पकः एतैर्वचनविकल्पैरग्राह्यः ॥

अर्थ— ह्याप्रमाणें बाह्यवाक्पद्धतीचा त्याग करून अंतर्वाक्पद्धतीचाही त्याग करावयास सांगतात—आत्म्यानें

असा विचार करावा कीं, दुसऱ्यानें मला सांगावयास पाहिजे असें जें मला वाटतें, व मीही शिष्यादिकांना जें सांगतों, ते दोन्हीही माझे व्यापार वेड्यासारखे आहेत. कारण, ते मोहनीयकर्माच्या उदयामुळेंच होत असल्यानें सर्व वेड्याच्या वागणुकीसारखे आहेत. ह्याचेंतरी कारण असें आहे कीं, वास्तविक पाहिलें असतां, मी निर्विकल्प म्हणजे भाषणाच्या अनेक पद्धतींनीं ज्याचें ज्ञान करून देतां येत नाहीं असा आहे. तात्पर्य—मी शुद्ध आत्मा असल्यानें "आत्मा" ह्या एक शब्दावांचून दुसऱ्या कोणत्याही शब्दांनीं माझें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून माझ्या स्वरूपज्ञानाला ह्या भाषणाच्या अनेक पद्धतींचा मुळींच उपयोग नाहीं. अर्थात् भाषणाचा त्याग करणेंच उचित आहे.

तदेव विकल्पातीतं स्वरूपं निरूपयन्नाह—

**यदग्राह्यं न गृण्हाति गृहीतं नापि मुञ्चति ॥**
**जानाति सर्वथा सर्वं तत्स्वसंवेद्यमस्म्यहम् ॥ २० ॥**

टीका—यत् शुद्धात्मस्वरूपं । अग्राह्यं कर्मोदयनिमित्तं क्रोधादिस्वरूपं । न गृह्णाति आत्मस्वरूपतया न स्वीकरोति । गृहीतमनन्तज्ञानादिस्वरूपं । नैव मुञ्चति कदाचिन्न परित्यजति । तेन च स्वरूपेण सहितं शुद्धमात्मस्वरूपं किं करोति ? जानाति । किं तत् ? सर्वं चेतनमचेतनं वा वस्तु । कथं जानाति ? सर्वथा द्रव्यपर्यायादिसर्वप्रकारेण । तदित्थम्भूतं स्वरूपं स्वसंवेद्यं स्वसंवेदनग्राह्यं अहमात्मा अस्मि भवामि ॥

अर्थ—अनेकप्रकारच्या भाषापद्धतींनीं अज्ञेय असें जें आत्मस्वरूप तें कोणत्या प्रकारचें आहे तें सांगतात—अग्राह्य म्हणजे कर्मोदयाच्या निमित्तानें उत्पन्न होणारे जे क्रोधादिविकार, त्यांना जें स्वस्वरूपानें ग्रहण करीत नाहीं; म्हणजे 'क्रोधादिविकार हें माझेंच एक स्वरूप आहे' असें जें मानीत नाहीं, आणि स्वतःचें जें अनंतज्ञानादिस्वरूप आहे त्याचा जें केव्हांहीं त्याग करीत नाहीं, आणि जें सर्वदा सर्ववस्तूंना प्रत्यक्ष जाणतें तें माझें म्हणजे शुद्ध आत्म्याचें स्वरूप आहे. तें "मी आत्मा आहे" अशा प्रकारच्या स्वसंवेदनानेंच समजावयाचें असें आहे.

इत्थम्भूतात्मपरिज्ञानात्पूर्वं कीदृशं मम चेष्टितमित्याह—

उत्पन्नपुरुषभ्रान्तेः स्थाणौ यद्वद्विचेष्टितम् ॥
तद्वन्मे चेष्टितं पूर्वं देहादिष्वात्मविभ्रमात् ॥ २१ ॥

टीका—उत्पन्नपुरुषभ्रान्तेः पुरुषोऽयमित्युत्पन्ना भ्रान्तिर्यस्य प्रतिपत्तुस्तस्य । स्थाणौ स्थाणुविषये । यद्वद्यत्प्रकारेण । विचेष्टितं विविधमुपकारादिरूपं चेष्टितं विपरीतं वा चेष्टितं । तद्वत् तत्प्रकारेण । मे चेष्टितं । क ? देहादिषु । कस्मात् ? आत्मविभ्रमात् आत्मविपर्यासात् कदा ? पूर्वं उक्तस्वरूपात्मज्ञानात्प्राक् ॥

अर्थ—अशा प्रकारचें आत्म्याच्या स्वरूपाचें ज्ञान होण्याच्या पूर्वी आपलें आचरण कसें असतें तें सांगतात—एखाद्या खांबावर ज्याला "हा मनुष्य आहे" असा भ्रम झाला आहे, अशा मनुष्याचें त्या खांबाशीं ज्या प्रकारचें वर्तन असतें, त्या प्रकारचेंच आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान होण्याच्या पूर्वी देहादिकांच्या ठिकाणीं "हाच आत्मा होय" अशा भ्रमात्मक समजुतीमुळें माझें (बहिरात्म्याचें) वर्तन होतें. म्हणजे, आत्म्याचें खरें स्वरूप समजण्याच्या पूर्वी हा जीव देहालाच आत्मा असें समजून व तो देहच आपलें सुखाचें मुख्य साधन आहे इत्यादि प्रकारच्या समजुतीनें वागत असतो.

साम्प्रतं तु तत्परिज्ञाने सति कीदृशं मे चेष्टितमित्याह—

यथाऽसौ चेष्टते स्थाणौ निवृत्ते पुरुषाग्रहे ॥
तथाचेष्टोऽस्मि देहादौ विनिवृत्तात्मविभ्रमः ॥ २२ ॥

टीका—असौ उत्पन्नपुरुषभ्रान्तिः । पुरुषाग्रहे पुरुषाभिनिवेशे निवृत्ते विनष्टे सति । यथा येन पुरुषाभिनिवेशजनितोपकारापकारोद्यमपरित्यागप्रकारेण । चेष्टते प्रवर्तते । तथाचेष्टोऽस्मि तथा तदुद्यमपरित्यागप्रकारेण चेष्टा यस्यासौ तथाचेष्टोऽस्मि भवाम्यहं । क? देहादौ । किंविशिष्टः? विनिवृत्तात्मविभ्रमः विशेषेण निवृत्त आत्मविभ्रमो यस्य । क? देहादौ ॥

अर्थ—आतां त्या आत्म्याच्या यथार्थस्वरूपाचें ज्ञान झालें असतां आपलें वर्तन कसें आहे तें सांगतात—खांबावर ज्याला 'हा पुरुष आहे' असा भ्रम झाला आहे, त्या पुरुषाचा तो भ्रम नाहींसा झाल्यावर तो ज्याप्रमाणें त्या खांबाशीं वागतो; म्हणजे तो ज्याप्रमाणें "हा पुरुष नसून खांब आहे, म्हणून ह्याच्यापासून आपल्यास कोणताही उपकार व्हावयाचा नाहीं, व अपकारही व्हावयाचा नाहीं" असें समजून वागतो; त्याप्रमाणेंच आचार्य म्हणतात, मीही मला आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यामुळें शरीरादिकांबद्दल वागत आहें. म्हणजे शरीर, भार्या, पुत्र वगैरे हे माझ्यावर उपकार करणारे अर्थात् मला सुख देणारे किंवा अपकार करणारे आहेत असें मी समजेनासा झालों आहें.

अथेदानीमात्मनि स्त्र्यादिलिङ्गैकत्वादिसंख्याविभ्रमनिवृत्त्यर्थी तद्विविक्तसाधारणस्वरूपं दर्शयन्नाह—

येनात्मनाऽनुभूयेऽहमात्मनैवात्मनात्मनि ॥
सोऽहं न तन्न सा नासौ नैको न द्वौ न वा बहुः ॥२३॥

टीका—येनात्मना चैतन्यस्वरूपेण इत्थंभावे तृतीया । अहमनुभूये । केन कर्त्रा ? आत्मनैव अनन्येन । केन करणभूतेन ? आत्मना स्वसंवेदनस्वभावेन । क्व ? आत्मनि स्वस्वरूपे । सोऽहं इत्थम्भूतस्वरूपोऽहं ।

न तत् न नपुंसकं । न सा न स्त्री । नासौ न पुमान् अहं । तथा नैको न द्वौ न वा बहुरहं । स्त्रीत्वादिधर्माणां कर्मोत्पादितस्वरूपत्वात् ॥

अर्थ—आतां "आत्म्याच्या ठिकाणीं स्त्री वगैरे चिन्हें व एक, दोन, वगैरे संख्या हीं आहेत." अशा भ्रमाचें निवारण करण्याकरितां, स्त्रीपुरुषादि चिन्हें व संख्या इत्यादिकांहून निराळें असून त्यांत मिश्र दिसणारें असें आत्मस्वरूप दाखवितात—आत्मा आपल्या स्वसंवेदनाच्या योगानें आपल्याच ठिकाणीं ज्या चैतन्य स्वभावानें युक्त असलेल्या माझा अनुभव करीत आहे, म्हणजे मला जाणत आहे, तो मी, पुरुष नाहीं, स्त्री नाहीं, व नपुंसकही नाहीं. तसेंच तो मी एक नाहीं, दोन नाहीं, व पुष्कळ (अनेक)ही नाहीं. तात्पर्य, मी शुद्धचैतन्यस्वरूप असलेला असा स्वसंवेदनानें अनुभवास येत असल्यानें माझ्या ठिकाणीं स्त्रीत्व, पुरुषत्व व नपुंसकत्व हे धर्म नाहींत. कारण, हे धर्म कर्मामुळें उत्पन्न झालेले असे असल्यामुळें ते शरीराचे आहेत चैतन्याचा त्यांचा कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं. तसेंच मला एकत्व, द्वित्व वगैरे संख्येचाही संबंध नाहीं. कारण, तीही शरीराचाच धर्म आहे.

येनात्मना त्वमनुभूयसे स कीदृश इत्याह—

यदभावे सुषुप्तोऽहं यद्भावे व्युत्थितः पुनः ॥
अतीन्द्रियमनिर्देश्यं तत्स्वसंवेद्यमस्म्यहम् ॥ २४ ॥

टीका—यस्य शुद्धस्य स्वसंवेद्यस्य रूपस्य । अभावे अनुपलम्भे सुप्तो यथावत्पदार्थपरिज्ञानाभावलक्षणनिद्रया गाढाक्रान्तः । यद्भावे यस्य तत्स्वरूपस्य भावे उपलम्भे । पुनर्व्युत्थितः विशेषेणोत्थितो जागरितोऽहं यथावत्स्वरूपपरिच्छित्तिपरिणत इत्यर्थः । किंविशिष्टं तत्स्वरूपं ? अतीन्द्रियं इन्द्रियैरजन्यमग्राह्यं च । अनिर्देश्यं शब्दविकल्पागोचरत्वादिदंतयाऽनिदन्तया वा निर्देष्टुमशक्यं । तदेवंविधं स्वरूपं कुतः सिद्धमित्याह—तत् स्वसंवेद्यं तदुक्तप्रकारकस्वरूपं स्वसंवेदग्राह्यं अहमस्मीति ॥

अर्थ—ज्या शुद्धस्वरूपाच्या अभावामुळें मी निद्रेनें व्याप्त होतों, आणि ज्याच्या अस्तित्वामुळें तर मी जागृत झाल्याप्रमाणें होतो, म्हणजे जें ज्ञान अर्थात् शुद्धचैतन्यस्वरूपी केवलज्ञान नसल्यामुळें मी निद्रेनें व्याप्त असतो म्हणजे मला पदार्थाच्या स्वरूपाचें यथार्थज्ञान किंवा संपूर्णज्ञान होत नाहीं, आणि ज्याच्या अस्तित्वामुळेंच मला कोणत्याही वस्तूच्या स्वरूपाचें यथार्थ अथवा संपूर्ण ज्ञान होतें; तें अतींद्रिय म्हणजे इंद्रियापासून होणाऱ्या ज्ञानांत विषय न होणारें असें माझें (आत्म्याचें) स्वरूप आहे, तें शब्दांनीं दाखवितां येण्यासारखें नाहीं. परंतु तें स्वसंवेद्य असल्यानें नाहीं असेंही म्हणतां यावयाचें नाहीं; असें आहे.

तत्स्वरूपं संवेदयतो रागादिप्रक्षयान्न क्वचिच्छत्रुमित्रव्यवस्था भवतीति दर्शयन्नाह—

क्षीयन्तेऽत्रैव रागाद्यास्तत्त्वतो मां प्रपश्यतः ॥
बोधात्मानं ततः कश्चिन्न मे शत्रुर्न च प्रियः ॥ २५ ॥

टीका—अत्रैव न केवलमग्रे किन्तु अत्रैव जन्मनि । क्षीयन्ते । के ते? रागाद्याः आदौ भव आद्यः राग आद्यो येषां द्वेषादीनां ते तथोक्ताः किं कुर्वन्तस्ते क्षीयन्ते? तत्वतो मां प्रपश्यतः । कथम्भूतं मां? बोधात्मानं ज्ञानस्वरूपं । तत इत्यादि—यतो यथावदात्मानं पश्यतो रागादयः प्रक्षीणास्ततस्तस्मात्कारणात् । न मे कश्चिच्छत्रुः । न च नैव । प्रियो मित्रम् ॥

अर्थ— आत्म्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार होऊं लागला म्हणजे रागादिविकारांचा नाश होत असल्यानें अशा स्थितीतील आत्म्याचा कोठेंही कोणी शत्रु नसतो व कोणी मित्रही नसतो; असें ह्या श्लोकांत सांगतात—शुद्धज्ञानरूपी असलेल्या मला मी वास्तवस्वरूपानें अवलोकन करूं लागलों म्हणजे ह्याच जन्मांत माझ्या ठिकाणीं कर्मोपाधीमुळें प्राप्त झालेले रागादिविकार नष्ट होतात. आणि असें झाल्यामुळें जगांत माझा कोणी शत्रु नाहीं, व मित्रही नाहीं; असें होतें. तात्पर्य—आत्म्याचें खरें स्वरूप समजूं लागलें म्हणजे रागादिक हे आत्म्याचे स्वभावपर्याय नसल्यामुळें ते जातात; त्या योगानें असें होतें, कीं, प्रेमविकार नसल्यानें कोणी मित्र होत नाहींत; व क्रोधविकार नसल्यानें कोणी शत्रुही होत नाहींत. अधिक काय? पण हें शरीरही त्याचें मित्र नसतें.

यदि त्वमन्यस्य कस्यचिन्न शत्रुर्मित्रं वा तथापि तवान्यः कश्चिद्भविष्यतीत्याशंक्याह—

**मामपश्यन्नयं लोको न मे शत्रुर्न च प्रियः ॥**
**मां प्रपश्यन्नयं लोको न मे शत्रुर्न च प्रियः ॥ २६ ॥**

टीका— आत्मस्वरूपे प्रतिपन्नेऽप्रतिपन्ने वायं लोको मयि शत्रुमित्रभावं प्रतिपद्येत ? न तावदप्रतिपन्ने । मामपश्यन्नयं लोको न मे शत्रुर्न च प्रियः अप्रतिपन्ने हि वस्तुस्वरूपे रागाद्युत्पत्तावातिप्रसङ्गः । नापि प्रतिपन्ने यतः मां प्रपश्यन्नयं लोको न मे शत्रुर्न च प्रियः । आत्मस्वरूपप्रतीतौ रागादिप्रक्षयात्कथं क्वचिदपि शत्रुमित्रभावः स्यात् ॥

*अर्थ—आत्मज्ञ जीव जरी दुसऱ्याला आपला शत्रु* किंवा मित्र मानीत नसला तथापि दुसरे त्याला शत्रु अथवा मित्र मानीत असतील. ह्या शंकेचा निरास करतात—ज्यांत ज्यांना आत्म्याच्या स्वरूपाचे ज्ञान झालें नाहीं ते माझे म्हणजे आत्मज्ञानी जीवाचे शत्रु नाहींत व मित्रही नाहींत. म्हणजे ते जीव आत्मज्ञानी जीवाला आपला शत्रुही मानीत नाहींत, व मित्रही मानीत नाहींत. कारण, ज्याच्याशीं शत्रुत्व किंवा मित्रत्व करावयाचें, त्याच्या स्वरूपाचें ज्ञान अगोदर असावें लागतें. ते नसतांही जर कोणी शत्रुत्व किंवा मित्रत्व करतो, असें म्हणावें, तर, कोण पाहिजे तो कोणा पाहिजे त्याच्याशीं शत्रुत्व किंवा मित्रत्व करूं लागेल. असें तर

लौकिकांत दिसत नाहीं. म्हणून ज्याला माझ्या स्वरूपाचें खरें ज्ञान नाहीं, तो माझ्याशीं शत्रुत्व किंवा मित्रत्व करीत नाहीं असें निरुपायानें मानणें भाग आहे. बरें; ज्याला माझ्या ( आत्म्याच्या ) खऱ्या स्वरूपाचें ज्ञान आहे, तोही माझ्याशीं शत्रुत्व किंवा मित्रत्व करीत नाहीं. कारण, त्याला आत्म-स्वरूपाचें ज्ञान झालें असल्यानें त्याचें रागादिविकार नष्ट झालेले असतात; त्यालाही माझ्याशीं शत्रुत्व अथवा मित्रत्व करण्याचें प्रयोजन राहिलेलें नाहीं. तात्पर्य—दोन्ही प्रकारांनीं विचार केला असतां मला शत्रु समजणारा व मित्र समजणारा कोणीही नाहीं; असेंच सिद्ध होतें.

अन्तरात्मनो बहिरात्मत्वत्यागे परमात्मत्वप्राप्तौ चोपायत्वं दर्शयन्नाह—

त्यक्त्वैवं बहिरात्मानमन्तरात्मव्यवस्थितः ॥
भावयेत्परमात्मानं सर्वसंकल्पवर्जितम् ॥ २७ ॥

टीका—एवमुक्तप्रकारेणान्तरात्मव्यवस्थितः सन् । बहिरात्मानं त्यक्त्वा परमात्मानं भावयेत् । कथंभूतं ? सर्वसंकल्पवर्जितं विकल्पजाल-रहितं अथवा सर्वसंकल्पवर्जितः सन् भावयेत् ॥

अर्थ—बहिरात्मत्वाचा त्याग व परमात्मत्वाची प्राप्ति ह्या दोहोंचाही साधक अंतरात्मा हाच आहे; असें सांगतात—

ह्याप्रमाणें अन्तरात्म्याच्या ठिकाणीं दृढस्थिति ज्याची झाली आहे अशा जीवानें बहिरात्म्याचा त्याग करून म्हणजे आपण बहिरात्मा नव्हे अर्थात् इंद्रियांच्या साहाय्यानें विषयोपभोग करणारा मी नव्हे असा निश्चय करून सर्वप्रकारच्या कल्पनांनीं रहित म्हणजे कल्पित अशा सर्वप्रकारच्या स्वरूपांनीं रहित अर्थात् शुद्धचैतन्यमात्रस्वरूप असा परमात्मा मी आहें, असें चिंतन करावें. तात्पर्य—दोन्ही गोष्टी अंतरात्म्यानेंच करावयाच्या आहेत.

तद्भावनायाः फलं दर्शयन्नाह—

सोऽहमित्यात्तसंस्कारस्तस्मिन् भावनया पुनः ॥
तत्रैव दृढसंस्काराल्लभते ह्यात्मनः स्थितिम् ॥ २८ ॥

टीका– योऽनन्तज्ञानात्मकः प्रसिद्धः परमात्मा सोऽहमित्येवमात्तसंस्कारः आत्तो गृहीतः संस्कारो वासना येन । कया कस्मिन् ? भावनया तस्मिन् परमात्मनि भावनया सोऽहमित्यभेदाभ्यासेन । पुनरित्यन्तर्गर्भितवीप्सार्थः । पुनः पुनस्तस्मिन् भावनया । तत्रैव परमात्मन्येव दृढसंस्कारात् अविचलवासनावशात् । लभते प्राप्नोति ध्याता । हि स्फुटम् । आत्मनः स्थितिं आत्मन्यचलतां अनन्तज्ञानादिचतुष्टयरूपतां वा ॥

अर्थ—वर सांगितलेल्या परमात्मभावनेचें फळ काय तें सांगतात—वर सांगितल्या प्रकारचें चिंतन पुनः पुनः

केल्यानें, तो अनंतज्ञानादिस्वरूप म्हणून प्रसिद्ध असलेला परमात्मा मीच आहे असा संस्कार उत्पन्न होतो. आणि त्या आत्म्याविषयींचा तोच संस्कार दृढ झाला म्हणजे चिंतन करणारा परमात्म्याच्या अचलस्वरूपाला प्राप्त होतो. म्हणजे तो चिंतन करणारा परमात्म्याच्या अनंतज्ञानादिचतुष्टय-स्वरूपाला प्राप्त होतो.

नन्वात्मभावनाविषये कष्टपरम्परासद्भावेन भयोत्पत्तेः कथं कस्यचित्तत्र प्रवृत्तिरित्याशङ्कां निराकुर्वन्नाह—

मूढात्मा यत्र विश्वस्तस्ततो नान्यद्भयास्पदम् ॥
यतो भीतस्ततो नान्यदभयस्थानमात्मनः ॥ २९ ॥

टीका– मूढात्मा बहिरात्मा । यत्र शरीरपुत्रकलत्रादिषु । विश्वस्तोऽवञ्चकाभिप्रायेण विश्वासं प्रतिपन्नः मदीया एते अहमेतेषामिति बुद्धिं गत इत्यर्थः ॥ ततो नान्यद्भयास्पदं ततः शरीरादेर्नान्यद्भयास्पदं संसारदुःखत्रासस्यास्पदं स्थानं । यतो भीतः परमात्मस्वरूपसंवेदनाद्भीतः त्रस्तः । ततो नान्यदभयस्थानं ततः स्वसंवेदनात् । नान्यत् । अभयस्य संसारदुःखत्रासाभावस्य । स्थानमास्पदं । सुखास्पदं ततो नान्यदित्यर्थः ॥

अर्थ— वरील श्लोकांत जी परमात्म्याची भावना करण्याविषयीं सांगितलें आहे, त्यांत अनेक कष्ट असल्यामुळें भीति उत्पन्न होते. मग त्या परमात्मभावनेविषयीं जीवाची

प्रवृत्ति कशी व्हावी? अशा शंकेचा निरास करतात—हा अज्ञानी असा बहिरात्मा ज्या शरीर, पुत्र, स्त्री वगैरे वस्तूंवर विश्वास ठेवितो, म्हणजे हे शरीरादि मला केव्हांही फसवावयाचे नाहींत; कारण, हे माझे आहेत आणि मी ह्यांचा आहे अशी बुद्धि धारण करतो; त्यांच्याहून दुसरें भीतीचें स्थान मुळींच नाहीं. हे शरीरादिकच संसारदुःखाला साधनीभूत असे असल्यानें मोठेच भयप्रद आहेत. आणि ज्या परमात्मचिंतनापासून हा बहिरात्मा भीत आहे, तें परमात्मचिंतन संसारसंबंधीं दुःख नाहींसें करणारें असल्यामुळें त्याच्यासारखें दुसरें निर्भय स्थान नाहीं. म्हणून परमात्मचिंतनांत कष्ट नसल्यानें भीति मानण्याचें कारण नाहीं.

तस्यात्मनः कीदृशः प्रतिपत्त्युपाय इत्याह—

**सर्वेन्द्रियाणि संयम्य स्तिमितेनान्तरात्मना ॥**
**यत्क्षणं पश्यतो भाति तत्तत्त्वं परमात्मनः ॥ ३० ॥**

टीका—संयम्य स्वविषये गच्छन्ति निरुध्य । कानि ? सर्वेन्द्रियाणि पञ्चापीन्द्रियाणि ! तदनन्तरं स्तिमितेन स्थिरीभूतेन । अन्तरात्मना मनसा । यत्स्वरूपं भाति । किं कुर्वतः ? क्षणं पश्यतः क्षणमात्रमनुभवतः बहुतरकालं मनसः स्थिरीकर्तुमशक्यत्वात् स्तोककालं मनोनिरोधं कृत्वा पश्यतो यच्चिदानन्दस्वरूपं प्रतिभाति तत्तत्वं तद्रूपं स्वरूपं परमात्मनः ॥

अर्थ—त्या आत्म्याच्या प्राप्तीचा उपाय कोणता हें सांगतात—आपापले विषय ग्रहण करण्यास प्रवृत्त झालेल्या श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियांचा निरोध करून (त्यांना विषयांकडे जाऊं न देतां) आणि अंत:करण स्थिर करून एक क्षणभर अंतर्वृत्ति करून पहाणाऱ्याला जें चिदानन्दस्वरूप अनुभवाला येतें, तेंच परमात्म्याचें खरें स्वरूप होय.

कस्मिन्नाराधिते तत्स्वरूपप्राप्तिर्भविष्यतीत्याशंक्याह—

य: परात्मा स एवाहं योऽहं स परमस्तत: ॥
अहमेव मयोपास्यो नान्य: कश्चिदिति स्थिति: ॥ ३१ ॥

टीका– य: प्रसिद्ध: पर उत्कृष्ट आत्मा स एवाहं । योऽहं य: स्वसंवेदनेन प्रसिद्धोऽहमन्तरात्मा स परम: परमात्मा । ततो यतो मया सह परमात्मनोऽभेदस्ततोऽहमेव मया उपास्य आराध्य: । नान्य: कश्चिन्मयोपास्य इति स्थिति: । एवं स्वरूप एवाराध्याराधकभावव्यवस्था ॥

अर्थ—वर जें परमात्म्याचें स्वरूप सांगितलें आहे, त्याची प्राप्ति कोणाची उपासना केली असतां होईल; तें सांगतात—जो शास्त्रांत प्रतिपादन केलेला प्रसिद्ध असा परमात्मा आहे, तोच मी आहे; आणि जो मी आहें तोच परमात्मा आहे. असें असल्याकारणानें मी माझीच उपासना करावयाची आहे. दुसऱ्या कोणाचीही करावयाची नाहीं;

अशी खरी स्थिति आहे. ह्याप्रमाणें आत्मस्वरूपांतच उपास्य आणि उपासक ह्यांची व्यवस्था आहे. दुसरें ठिकाणीं कोठेंही जाण्याचें कारण नाहीं. तात्पर्य, आत्म्यानें स्वत:लाच परमात्मा मानून त्याची उपासना करावयाची आहे. म्हणजे त्या उपासनेच्या योगानें त्याला परमात्मस्वरूपाची प्राप्ति होते.

एतदेव दर्शयन्नाह—

**प्राच्याव्य विषयेभ्योऽहं मां मयैव मयि स्थितम् ॥**
**बोधात्मानं प्रपन्नोऽस्मि परमानन्दनिर्वृतम् ॥ ३२ ॥**

टीका—ममात्मानमहं प्रपन्नोऽस्मि भवामि किं कृत्वा ? प्रच्याव्य व्यावर्त्य । केभ्यः ? विषयेभ्यः । केन कृत्वा ? मयैवात्मस्वरूपेणैव करणात्मना । क स्थितं मां प्रपन्नोऽहं ? मयि स्थितं आत्मस्वरूपे एव स्थितं । कथम्भूतं मां ? बोधात्मानं ज्ञानस्वरूपं । पुनरपि कथम्भूतं ? परमानन्दनिर्वृतं परश्चासावानन्दश्च सुखं तेन निवृतं सुखीभूतं । अथवा परमानन्दनिर्वृतोऽहम् ॥

अर्थ—वरील श्लोकांत "आत्म्याचीच उपासना आत्म्यानें करावयाची आहे," असें जें सांगितलें तोच प्रकार ह्या श्लोकांतही दाखवितात—आत्म्यानें अशी भावना करावी कीं, मी माझ्या योगानें मलाच विषयापासून परतवून माझ्याच ठिकाणीं असलेला जो ज्ञानस्वरूप व परमानंदानें सुखित

झालेला असा शुद्धात्मा त्याच्या स्वरूपाला प्राप्त झालों आहे. अर्थात् मी विषयांचा त्याग केल्यानें माझें जें शुद्धस्वरूप तें मला प्राप्त झालें आहे. म्हणून मला माझ्या कडून निराळें कांहीं प्राप्त झालेलें नाहीं. तात्पर्य—ह्या आतां सांगितलेल्या भावनेंत अंतरात्म्याला परमात्मरूपाची प्राप्ति व्हावयाची असल्यानें त्यानें आपलीच उपासना आपण करावयाची आहे; असें जाणावें.

एवमात्मानं शरीराद्भिन्नं यो न जानाति तं प्रत्याह—

यो न वेत्ति परं देहादेवमात्मानमव्ययम् ॥
लभते स न निर्वाणं तप्त्वाऽपि परमं तपः ॥ ३३ ॥

टीका—यः प्रतिपन्नो देहात्परं भिन्नमात्मानमेवमुक्तप्रकारेण न वेत्ति किं विशिष्टं ? अव्ययं अपरित्यक्तानन्तचतुष्टयस्वरूपं । स प्रतिपन्नान्न निर्वाणं लभते । किं कृत्वा ? तप्त्वापि । किं तत् ? परमं तपः ॥

अर्थ—आत्मा हा शरीराहून निराळा आहे असें जर समजलें नाहीं, तर काय परिणाम होतो तें सांगतात—जो जीव ह्या वर दाखविलेल्या प्रकारानें आत्मा हा आज आपल्याला प्राप्त झालेल्या देहाहून निराळा आहे असें जाणत नाहीं; तो जीव फार मोठी तपश्चर्या करूनही मोक्षाला प्राप्त होत नाहीं. कारण, त्याला आत्म्याचें खरें स्वरूप कळलें नाहीं.

ननु परमतपोऽनुष्ठायिनां महादुःखोत्पत्तितो मनःखेद-सद्भावात्कथं निर्वाणप्राप्तिरिति वदन्तं प्रत्याह—

**आत्मदेहान्तरज्ञानजनिताल्हादनिर्वृतः ॥**
**तपसा दुष्कृतं घोरं भुञ्जानोऽपि न खिद्यते ॥ ३४ ॥**

टीका—आत्मा च देहश्च तयोरन्तरज्ञानं भेदज्ञानं तेन जनितश्चासावाह्लादश्च परमप्रसत्तिः तेन निवृतः सुखीभूतः सन् । तपसा द्वादशविधेन कृत्वा । दुष्कृतं घोरं भुञ्जानोऽपि दुष्कर्मणो रौद्रस्य विपाकमनुभवन्नपि । न खिद्यते न खेदं गच्छति ॥

अर्थ—आत्म्याचें तत्त्वत: ज्ञान झालें तरी कर्मांच्या निर्जरेकरितां तप अवश्य केलेंच पाहिजे. असें असल्यानें, तपश्चर्या करणाऱ्यांना कायक्लेश फार होत असल्यामुळें त्यांच्या मनाला फार खेद होतो. मग आत्मज्ञान झाल्यावर सुद्धां तपश्चर्येचें दु:ख भोगावेंच लागत असल्यानें मोक्षप्राप्ति कशी होणार? म्हणजे दु:खाच्या भीतीनें तप करण्यासच कोणीही प्रवृत्त होणार नाहीं. मग जीवाला मोक्षप्राप्ति कशी व्हावी? अशा शंकेचें समाधान करतात—आत्मा आणि शरीर ह्यांच्यामध्यें भेद काय आहे हें समजल्यावर जो आनंद होतो, त्या योगानें सुखी झालेला असा हा जीव, द्वादशविध तपश्चर्येच्या योगानें रौद्रकर्मांच्या फळाचा जरी अनुभव

करीत असतो, म्हणजे तपापासून होणाऱ्या कायक्लेशांना जरी भोगीत असतो, तथापि तो खिन्न होत नाहीं. अर्थात् त्याच्याकडे पहाणाऱ्याच्या दृष्टीनें जरी तो क्लेश भोगीत आहे असें वाटतें, तरी त्या कायक्लेशापासून त्याला मुळींच खेद होत नाहीं. कारण, त्याला आत्म्याच्या सुखस्वरूपाचें ज्ञान असल्यामुळें "हे क्लेश आपल्याला नसून शरीराला आहेत" असें त्याला निश्चयानें वाटत असतें. असें असल्यामुळें "दुःखाच्या भीतीनें तपश्चर्या कशी होणार ही शंका मुळींच संभवत नाहीं.

खेदं गच्छतामात्मस्वरूपोपलम्भाभावं दर्शयन्नाह—

**रागद्वेषादिकल्लोलैरलोलं यन्मनोजलम् ॥**
**स पश्यत्यात्मनस्तत्त्वं स तत्त्वं नेतरो जनः ॥ ३५ ॥**

टीका– रागद्वेषादय एव कल्लोलास्तैरलोलमचञ्चलमकलुषं वा। यन्मनोजलं मन एव जलं मनोजलं यस्य मनोजलं यन्मनोजलं। स आत्मा। पश्यति। आत्मनस्तत्त्वमात्मनः स्वरूपं। स तत्त्वं। स आत्मदर्शी तत्त्वं परमात्मस्वरूपं। नेतरो जनः तत्त्वं न भवति ॥

अर्थ—ज्यांना तपश्चर्या करीत असतां खेद होतो त्यांना आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं असें सांगतात—ज्या जीवाचें मनरूपी जळ रागद्वेषादि लाटांनीं चंचल होत नाहीं अथवा

अप्रसन्न होत नाहीं तोच आत्म्याचें यथार्थस्वरूप अवलोकन करीत असून तोच आत्म्याचें खरें स्वरूप होय. अर्थात् त्यालाच आत्मदर्शी समजावें. इतर जीव आत्मदर्शी नव्हेत असें समजावें. तात्पर्य—ज्याला तयश्रयेंपासून दुःख होतें त्याचें मन आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं निश्चल झालेलें नसतें. म्हणून अशा चंचल मनाच्या जीवाला आत्मज्ञान झालेंच नाहीं असें समजावें.

किं पुनस्तत्त्वशब्देनोच्यते इत्याह—

अविक्षिप्तं मनस्तत्त्वं विक्षिप्तं भ्रान्तिरात्मनः ॥
धारयेत्तदविक्षिप्तं विक्षिप्तं नाश्रयेत्ततः ॥ ३६ ॥

टीका– अविक्षितं रागाद्यपरिणतं देहादिनाऽऽत्मनोऽभेदाध्यवसाय-परिहारेण स्वस्वरूप एव निश्चलतां गतं । इत्थम्भूतं मनः तत्त्वं वास्तवं रूपमात्मनः । विक्षितं उक्तविपरीतं मनो भ्रान्तिरात्मस्वरूपं न भवति यत एवं तस्मात् धारयेत् । किं तत ? मनः । कथम्भूतं ? अविक्षिप्तं । विक्षिप्तं पुनस्तत् नाश्रयेन्न धारयेत् ॥

अर्थ—तत्व शब्दाचा अर्थ काय तो सांगतात—रागादि-परिणामांनीं व्यग्र झालेलें—म्हणजे 'देह हाच आत्मा आहे' अशी समजूत टाकून देऊन, स्वस्वरूपांत निश्चल असलेलें (एकाग्र झालेलें) जें भावमन, तेंच तत्व (आत्म्याचें स्वरूप)

होय. आणि रागादि परिणामांनीं व्यग्र झालेलें जें मन तो वास्तव आत्मा नसून आत्माभास होय. याकरितां निश्चळ असें जें मन त्याचा आश्रय करावा. म्हणजे मन नेहमीं एकाग्र ठेवावें. आणि चंचल अशा मनाचा त्याग करावा. म्हणजे मनांत अनेक कल्पना आणूं नयेत.

कुत: पुनर्मनसो विक्षेपो भवति ? कुतश्चाविक्षेप इत्याह—

अविद्याभ्याससंस्कारैरवशं क्षिप्यते मनः ॥
तदेव ज्ञानसंस्कारैः स्वतस्तत्त्वेऽवतिष्ठते ॥ ३७ ॥

टीका– शरीरादौ शुचिस्थिरात्मयादिज्ञानान्यविद्यास्तासामभ्यास: पुनः पुनः प्रवृत्तिस्तेन जनिताः संस्कारा वासनास्तैः कृत्वा । अवशं विषयेन्द्रियाधीनमनात्मायत्तमित्यर्थः । क्षिप्यते विक्षिप्तं भवति मन: । तदेव मन: ज्ञानसंस्कारैरात्मनः शरीरादिभ्यो भेदज्ञानाभ्यासैः । स्वतः स्वयमेव । तत्त्वे आत्मस्वरूपे अवतिष्ठते ॥

अर्थ—मनाला व्यग्रता आणि एकाग्रता कशानें प्राप्त होतात, तें सांगतात—अविद्यांच्या म्हणजे शरीरादिकांविषयीं "हीं आपलीं आहेत" अशा प्रकारच्या ज्ञानांच्या अभ्यासानें होणाऱ्या संस्कारांच्या योगानें विषय आणि इंद्रियें ह्यांच्या ताब्यांत सांपडलेल्या मनाला व्यग्रता ( चंचलपणा ) येते. आणि त्याच मनाला ज्ञानाचे म्हणजे आत्मा हा शरीरादिकांहून

भिन्न आहे अशा समजुतीचे संस्कार झाले असतां त्या संस्कारांच्या अभ्यासानें मन एकाग्र होतें. म्हणजे आपोआपच स्वस्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होतें.

चित्तस्य विक्षेपेऽविक्षेपे च फलं दर्शयन्नाह—

**अपमानादयस्तस्य विक्षेपो यस्य चेतसः ॥**
**नापमानादयस्तस्य न क्षेपो यस्य चेतसः ॥ ३८ ॥**

टीका— अपमानो महत्वखण्डनं अवज्ञा च । स आदिर्येषां मदेर्ष्यामात्सर्यादीनां ते अपमानादयो भवन्ति । यस्य चेतसो विक्षेपो रागादिपरिणतिर्भवति । यस्य पुनश्चेतसो न क्षेपो विक्षेपो नास्ति । तस्य नापमानादयो भवन्ति ॥

अर्थ— मनाला व्यग्रता आणि एकाग्रता असल्याचें फल सांगतात— ज्याच्या मनाला विक्षेप म्हणजे व्यग्रता (रागादिरूपानें परिणाम) असते, त्याचा सर्वत्र अपमान होतो, त्याला मद असतो, त्याला ईर्ष्या असते म्हणजे दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं, त्याला मत्सर म्हणजे दुसऱ्याचा द्वेष असतो. आणि ज्याच्या मनाला विक्षेप असत नाहीं, म्हणजे ज्याचे मनांत रागद्वेषादि विकारांनीं ठाणें दिलें नाहीं त्याला अपमान वगैरे नसतात व त्यामुळें त्यापासून होणारे दुःखही होत नाहीं.

अपमानादीनां चापगम उपायमाह—

**यदा मोहात्प्रजायेते रागद्वेषौ तपस्विनः ॥**
**तदैव भावयेत्स्वस्थमात्मानं शाम्यतः क्षणात् ॥ ३९ ॥**

टीका– मोहान्मोहनीयकर्मोदयात् । यदा प्राजयते उत्पद्येते । कौ ? रागद्वेषौ । कस्य ? तपस्विनः । तदैव रागद्वेषोदयकाल एव । आत्मनं स्वस्थं बाह्यविषयाद्व्यावृत्तस्वरूपस्थं भावयेत् । शाम्यत उपशमं गच्छतः । रागद्वेषौ । क्षणात् क्षणमात्रेण ॥

अर्थ— अपमानादिकांच्या नाशाचा उपाय सांगतात. मोहनीयकर्माच्या उदयामुळें ज्यावेळीं तपश्चर्या करणाऱ्या मुनीला रागद्वेष उत्पन्न होतील, त्याच वेळीं त्यानें बाह्यविषयापासून परावृत्त अशा स्वरूपानें असणाऱ्या आत्म्याचें चिंतन करावें. म्हणजे माझें स्वरूप रागद्वेषादिकांच्या रूपानें परिणत होणारें नसून मी शुद्धज्ञानस्वरूप आत्मा आहे असें चिंतन करावें. असें केलें असतां त्याच क्षणीं ते रागद्वेष शांत होतात.

तत्र रागद्वेषयोर्विषयं विपक्षं च दर्शयन्नाह—

**यत्र काये मुनेः प्रेम ततः प्रच्याव्य देहिनम् ॥**
**बुध्या तदुत्तमे काये योजयेत्प्रेम नश्यति ॥ ४० ॥**

टीका– यत्रात्मीये परकीये वा काये । वा शरीरेन्द्रियविषयसङ्घाते । मुनेः प्रेम स्नेहः । ततः कायात् प्रच्याव्य व्यावर्त्य । देहिनं आत्मानं कया ? बुध्या विवेकज्ञानेन । पश्चात्तदुत्तमे काये तस्मात्प्रागुक्तकायादुत्तमे चिदानन्दमये । काये आत्मस्वरूपे । योजयेत् । कया कृत्वा ? बुध्या अन्तर्दृष्ट्या । ततः किं भवति ? प्रेम नश्यति कायस्नेहो न भवति ॥

अर्थ— आतां मुनीनें रागद्वेष कशावर करावेत आणि कशावर न करावेत हें सांगतात— ज्या शरीरावर अथवा ज्या शरीर, इंद्रिय आणि विषय ह्यांच्या समुदायावर मुनीचें प्रेम उत्पन्न झालें असेल त्या शरीरावरून अथवा त्या समुदायावरून आत्म्याला काढून, त्याला त्या शरीरादिकांपेक्षां उत्तम अशा शरीराकडे— ( आनंदमय अशा स्वस्वरूपाकडे ) लावावें. म्हणजे आत्म्याला शरीरावरील प्रेम टाकावयास लावून आपल्या स्वतःच्या आनंदमय अशा स्वरूपावर अंतर्दृष्टीनें प्रेम करावयास लावावें. असें केल्यानें आत्म्याला प्रेम करण्याला विषय मिळतो. आणि पूर्वीचें शरीरावरील प्रेम नाश पावतें. अर्थात् स्वस्वरूपावर त्याचें प्रेम जडतें आणि शरीरावरचें प्रेम नाहींसें होतें. म्हणजे द्वेष उत्पन्न होतो.

तस्मिन्नष्टे किं भवतीत्याह—

आत्मविभ्रमजं दुःखमात्मज्ञानात्प्रशाम्यति ॥
नायतास्तत्र निर्वान्ति कृत्वाऽपि परमं तपः ॥ ४१ ॥

टीका— आत्मविभ्रमजं आत्मनो विभ्रमः अनात्मशरीरादावात्मेति ज्ञानं तस्माज्जातं यत् दुःखं तत्प्रशाम्यति। कस्मादात्मज्ञानात् शरीरादिभ्यो भेदेनात्मस्वरूपवेदनात् । ननु दुर्धरतपोऽनुष्ठानान्मुक्तिसिद्धेरतस्तद् दुःखोपशमो न भविष्यतीति वदन्तं प्रत्याह नेत्यादि । तत्र आत्मस्वरूपे । अयताः अयत्नपराः । निर्वान्ति निर्वाणं गच्छन्ति सुखिनो वा भवन्ति न । कृत्वाऽपि तप्त्वाऽपि । किं तत ? परमं तपः दुर्द्धरानुष्ठानम् ॥

अर्थ— शरीरादिकांना आत्मा असें समजून जें आजपर्यंत त्यांच्यावर प्रेम केलें तें नाहींसें झालें असतां काय होतें तें सांगतात—शरीरादिकांवर हा आत्मा असा भ्रम झाल्यामुळें जें दुःख उत्पन्न झालेलें असतें, तें दुःख आत्म्याच्या यथार्थज्ञानानें नष्ट होतें. आतां आत्मभ्रांतीपासून झालेलें दुःख जरी आत्मज्ञानापासून गेलें, तरी तपश्चर्या केल्यावांचून मोक्षाची प्राप्ति होत नसल्यामुळें, तें दुःख शिल्लक राहिलेंच आहे; तेव्हां आत्मज्ञान होऊन तरी काय उपयोग आहे? असें जर कोणी म्हणेल, तर, तें चुकीचें आहे. कारण, आत्म्याच्या वास्तवस्वरूपज्ञानाबद्दल ज्यांनीं यत्न केला नसेल, त्यांनीं जरी दुर्धर तप केलें तथापि त्यांना मोक्षसुखाची प्राप्ति होत नाहीं. म्हणून, नुसत्या तपश्चर्येनें मोक्षप्राप्ति होत नसून आत्मज्ञान झाल्यावरच तपश्चर्या केली पाहिजे; म्हणजेच मोक्षप्राप्ति होते. तेव्हां ह्या सर्वाला कारण शरीरावर आत्मबुद्धीनें जडलेलें प्रेम टाकून देणें हेंच आहे. म्हणून प्रथम त्याचा त्याग करावा.

तच्च कुर्वाणो बहिरात्मा च किं करोतीत्याह—

शुभं शरीरं दिव्यांश्च विषयानभिवाञ्छति ॥
उत्पन्नात्ममतिर्देहे तत्त्वज्ञानी ततश्च्युतिम् ॥ ४२ ॥

टीका- देहे उत्पन्नात्ममतिर्बाहिरात्मा। अभिवाञ्छति अभिलषति। किं तत्? शुभं शरीरं। दिव्याँश्च उत्तमान् स्वर्गसम्बन्धिनो वा विषयान्। अन्तरात्मा किं करोती त्याह- तत्त्वज्ञानी ततश्च्युतिम्। तत्त्वज्ञानी विवेकी अन्तरात्मा। ततः शरीरादेः च्युतिं व्यावृत्तिं मुक्तिरूपां अभिवाञ्छति ॥

अर्थ— बहिरात्मा तप करीत असतां काय होतें, आणि अंतरात्मा तप करीत असतां काय होतें तें सांगतात—शरीरावर ज्याला आत्मा अशी बुद्धि झाली आहे म्हणजे जो शरीरालाच आत्मा असें समजत आहे, असा जो बहिरात्मा तो तप करीत असतां; उत्तम शरीर, उत्तम विषय, स्वर्गातील विषय ह्यांची इच्छा करतो. आणि तत्वज्ञानी असा अंतरात्मा तप करीत असतां, शरीरादिकांपासून आपली मुक्ति व्हावी अशी इच्छा करीत असतो. असा ह्या दोघांच्या अभिलाषांत भेद आहे.

तत्त्वज्ञानीतरयोर्बन्धकत्वाबन्धकत्वे दर्शयन्नाह—

**परत्राहम्मतिः स्वस्माच्च्युतो बध्नात्यसंशयम् ॥**
**स्वस्मिन्नहम्मतिश्च्युत्वा परस्मान्मुच्यते बुधः ॥ ४३ ॥**

टीका- परत्र शरीरादौ अहम्मतिरात्मबुद्धिर्बहिरात्मा। स्वस्मादात्मस्वरूपात्। च्युतो भ्रष्टः सन्। बध्नाति कर्मबन्धनबद्धं करोत्यात्मानं। असंशयं यथा भवति तथा नियमेन बध्नातीत्यर्थ.। स्वस्मिन्नात्मस्वरूपे। अहम्मतिः बुधोऽन्तरात्मा। परस्माच्छरीरादेः। च्युत्वा पृथग्भूत्वा। मुच्यते सकलकर्मबन्धरहितो भवति ॥

अर्थ— आतां तत्वज्ञानी हा आत्म्याला बंध उत्पन्न करीत नाहीं, व अज्ञानी जो बहिरात्मा तो आत्म्याला बंध उत्पन्न करतो असें सांगतात—वरील श्लोकांत ज्या दोघा आत्म्यांचा निर्देश केला आहे, त्यांपैकीं शरीरावर आत्मबुद्धि धारण करणारा जो बहिरात्मा तो आपल्या स्वरूपापासून भ्रष्ट झाला असल्यामुळें निश्चयानें स्वतःला कर्मबंधानें बद्ध करतो. आणि स्वस्वरूपाच्याच ठिकाणीं आत्मबुद्धि धारण करणारा जो अंतरात्मा तो शरीरापासून निराळा होऊन सर्वप्रकारच्या कर्मबंधापासून मुक्त होतो.

यत्राहम्मतिर्बहिरात्मनो जाता तत्तेन कथमध्यवसीयते । यत्र चान्तरात्मनस्तत्तेन कथमित्याशंकयाह—

दृश्यमानमिदं मूढस्त्रिलिङ्गमवबुध्यते ॥
इदमित्यवबुद्धस्तु निष्पन्नं शब्दवर्जितम् ॥ ४४ ॥

टीका—दृश्यमानं शरीरादिकं । किंविशिष्टं त्रिलिङ्गं त्रीणि स्त्रीपुंनपुंसकलक्षणानि लिङ्गानि यस्य तत् दृश्यमानं त्रिलिङ्गं सत् । मूढो बहिरात्मा । इदमात्मतत्त्वं त्रिलिङ्गं मन्यते दृश्यमानादभेदाध्यवसायेन । यः पुनरवबुद्धोऽन्तरात्मा स इदमात्मतत्त्वमित्येवं मन्यते । न पुनस्त्रिलिङ्गतया । तस्याः शरीरधर्मतया आत्मस्वरूपत्वाभावात् ॥ कथम्भूतमिदमात्मस्वरूपं ? निष्पन्नमनादिसंसिद्धम् । तथा शब्दवर्जितं विकल्पाभिधानागोचरम् ॥

अर्थ—बहिरात्म्याची ज्या ठिकाणीं मीपणाची समजूत झाली आहे, तें तो कसें मानतो, आणि अंतरात्म्याची जेथें मीपणाची बुद्धि आहे, तें तो कसें मानतो, तें सांगतात—अज्ञानी असा बहिरात्मा नेत्राला दिसणारे जे शरीरादि पदार्थ, ते पुल्लिंग, स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग ह्या तीन लिंगाचे आहेत असें मानतो. बहिरात्मा ह्या शरीरालाच आत्मा समजणारा असल्यानें शरीराचे जे पुल्लिंगादि धर्म आहेत, ते आत्म्याचेच असें समजतो. अर्थात् आत्मे तीन लिंगाचे आहेत असें समजतो. आणि ज्ञानी असा जो अंतरात्मा तो पुल्लिंग, स्त्रीलिंग अशा प्रकारच्या शब्दकल्पनेंत विषय न होणारें व अनादिसिद्ध असें हें शरीराहून भिन्न असणारें आत्मतत्त्व आहे असें जाणतो. तात्पर्य—अज्ञानी जीव शरीराला आत्मा समजत असल्यानें त्याला शरीराचे धर्म आत्म्यावर भासतात. आणि ज्ञानी जीव आत्म्याला शरीराहून भिन्न मानीत असल्यानें त्याला शरीराचे धर्म आत्म्यावर भासत नाहीत. शुद्ध आत्मस्वरूपच भासतें.

ननु यद्यन्तरात्मैवात्मानं प्रतिपाद्यते तदा कथं पुमानहं गौरोऽहमित्यादिरूपं तस्य कदाचिद्भेदभ्रान्तिः स्यादिति वदन्तं प्रत्याह—

जानन्नप्यात्मनस्तत्त्वं विविक्तं भावयन्नपि ॥
पूर्वविभ्रमसंस्काराद्भ्रांतिं भूयोऽपि गच्छति ॥ ४५ ॥

टीका—आत्मनस्तत्त्वं स्वरूपं जानन्नपि । तथा विविक्तं शरीरादिभ्यो भिन्नं भावयन्नपि उभयत्रापिशब्दः परस्परसमुच्चये । भूयोऽपि पुनरपि । भ्रान्तिं गच्छति । कस्मात् ? पूर्वविभ्रमसंस्कारात् पूर्वविभ्रमो बहिरात्मावस्थाभावी शरीरादौ स्वात्मविपर्यासस्तेन जनितः संस्कारो वासना तस्मात् ॥

अर्थ—ह्या ठिकाणीं एक शंका येते, ती अशी—अंतरात्म्याला जर आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झालेलें असतें, तर मग "मी पुरुष आहे, मी गोरा आहे" असा शरीराच्या अभेदाचा भ्रम त्याला केव्हांतरी होत असतो; तो कां होतो ? ह्या शंकेचें समाधान ह्या श्लोकांत करतात— अंतरात्मा हा आत्म्याच्या शुद्ध स्वरूपाला जाणत असतो, व आत्मा हा शरीराहून निराळा आहे अशी भावनाही करीत असतो; तरीसुद्धां, पूर्वीं असलेल्या बहिरात्म्याच्या अवस्थेंत त्याला जो शरीरादिकांविषयीं आत्मभ्रम झालेला असतो, त्यामुळें झालेल्या संस्काराच्या योगानें त्याला (अंतरात्म्याला) पुनः देखील (अंतरात्मास्थितींतही) तीच भ्रांति होत असते. म्हणून ती भ्रांति अंतरात्म्याच्या त्या अवस्थेंतील नसून पूर्वींच्या अवस्थेंतील आहे.

भूयो भ्रांतिं गतोऽसौ कथं तां त्यजेदित्याह—

अचेतनमिदं दृश्यमदृश्यं चेतनं ततः ॥
क्व रुष्यामि क्व तुष्यामि मध्यस्थोऽहं भवाम्यतः ॥४६॥

टीका—इदं शरीरादिकं दृश्यमिन्द्रियैः प्रतीयमानं । अचेतनं जडं रोषतोषादिकं कृतं न जानातीत्यर्थः । यच्चेतनमात्मस्वरूपं । तददृश्यमिन्द्रियग्राह्यं न भवति । ततः यतो रोषतोषविषयं दृश्यं शरीरादिकमचेतनं चेतनस्त्वात्मस्वरूपमदृश्यत्वात्तद्विषयमेव न भवति ततः । क्व रुष्यामि क्व तुष्याम्यहं । अतः यतो रोषतोषयोः कश्चिदपि विषयो न घटते अतः मध्यस्थः उदासीनोऽहं भवामि ॥

अर्थ– अंतरात्म्याला वर सांगितल्याप्रमाणें पुनः भ्रम झाला, तर, त्यानें त्या भ्रमाचा त्याग कसा करावा तें सांगतात– त्यानें असा विचार करावा कीं, हें इंद्रियांच्या योगानें जाणण्याला योग्य असलेलें असें शरीर अचेतन अर्थात् ह्याच्यावर रागावलें असतां किंवा संतुष्ट झालें असतां त्या दोहोंचेंहि (रोषाचें व संतोषाचें) ह्याला ज्ञान नाहीं असें आहे. इंद्रियांच्या सहाय्यानें अनुभव–प्रतीति–घेत असलेले शरीरादिकांचे हे सर्व व्यापार अचेतन–जड–आहेत त्याला कांहीं तें समजतहि नाहीं. आणि ह्यांत जें चेतन म्हणजे बोधस्वरूप आत्मसमूह अर्थात् जाणणारें असें आत्म्याचें स्वरूप आहे, तें अदृश्य म्हणजे इंद्रियांच्या योगानें न समजणारें असें आहे. असें असल्यामुळें म्हणजे जें दिसतें आहे त्याला कांहीं समजत नाहीं, आणि ज्याला समजतें आहे तो दिसत नाहीं असें असल्यामुळें मीं कोणावर

रागावावें ? व कोणावर संतुष्ट व्हावें ? अर्थात् माझ्या रोषाला आणि संतोषाला विषय नसल्यानें माझें रागावणेंहि व्यर्थ आहे, आणि संतुष्ट होणेंहि व्यर्थ आहे, म्हणून मीं रागद्वेषादि विकारांचा त्याग करून उदासीन असावें हें बरें. तात्पर्य—अशा विचारानें, त्यानें (अंतरात्म्यानें) आपल्या भ्रमाचा निरास करावा.

इदानीं मूढात्मनोऽन्तरात्मनश्च त्यागोपादानविषयं प्रदर्शयन्नाह—

**त्यागादाने बहिर्मूढः करोत्यध्यात्ममात्मवित् ॥**
**नान्तर्बहिरुपादानं न त्यागो निष्ठितात्मनः ॥ ४७ ॥**

टीका—मूढो बहिरात्मा त्यागोपादाने करोति । क्व ? बहिर्बाह्ये हि वस्तुनि द्वेषोदयादभिलाषाभावान्मूढात्मा त्यागं करोति । रागोदयात्तत्राभिलाषोत्पत्तेरुपादानमिति ॥ आत्मवित् अन्तरात्मा पुनरध्यात्मनि स्वात्मरूप एव त्यागोपादाने करोति । तत्र हि त्यागो रागद्वेषादेरन्तर्जल्पविकल्पादेर्वा । स्वीकारश्चिदानन्दादेः । यस्तु निष्ठितात्मा कृतकृत्यात्मा तस्य अन्तर्बहिर्वा नोपादानं तथा न त्यागोऽन्तर्बहिर्वा ॥

अर्थ—आतां बहिरात्म्याला त्याज्य व ग्राह्य विषय कोणता, व अंतरात्म्याला त्याज्य आणि ग्राह्य विषय कोणता ? हें सांगतात:—अज्ञानी असा बहिरात्मा—बाह्य वस्तूविषयीं द्वेष उत्पन्न झाल्यामुळें व तिची इच्छा नसल्यामुळें—बाह्यवस्तूचा त्याग करतो. आणि बाह्यवस्तूवर प्रेम उत्पन्न झाल्यानें व

ाची इच्छा होत असल्यामुळें बाह्यवस्तूचेंच ग्रहणही करतो. अंतरात्मा हा आत्मस्वरूपांतीलच कांहीं अंशाचा त्याग व कांहीं अंशाचें ग्रहण करतो. म्हणजे बहिरात्मावस्थेंत जे रागद्वेष आत्म्याचेंच स्वरूप आहेत असें वाटत असतात त्यांचा अंतरात्मावस्थेंत तो अंतरात्मा त्याग करतो. आणि आत्म्याच्या चिदानंदस्वरूपाचें ग्रहण करतो. तात्पर्य, अंतरात्म्याला "मी रागद्वेषादिपरिणामवान् नव्हे" असें जें वाटतें हा त्यानें केलेला त्याग होय. आणि त्याला "मी चिदानंदरूप आहे" असें जें वाटतें, तें त्याचें ग्रहण होय असें समजावें. आणि जो कृतकृत्य झालेला आत्मा (परमात्मा) आहे, तो बाह्य व आंतर अशा दोनही प्रकारच्या वस्तूंचा त्यागही करीत नाहीं; व ग्रहणही करीत नाहीं. कारण, तो कृतकृत्य झालेला असल्यामुळें त्याचें करावयाचें असें कांहींच उरलेलें नसतें.

अन्तस्त्यागोपादाने वा कुर्वाणोऽन्तरात्मा कथं कुर्यादित्याह

युञ्जीत मनसाऽऽत्मानं वाक्कायाभ्यां वियोजयेत् ॥
मनसा व्यवहारं तु त्यजेद्वाक्काययोजितम् ॥ ४८ ॥

टीका— आत्मानं युञ्जीत सम्बद्धं कुर्यात् । केन सह ? मनसा मानसज्ञानेन चित्तमात्मेत्यभेदेनाध्यवसेदित्यर्थः । वाक्कायाभ्यां तु पुन-

वियोजयेत् पृथक्कुर्यात् वाक्काययोरात्माभेदाध्यवसायं न कुर्यादित्यर्थः। एतच्च कुर्वाणो व्यवहारं तु प्रतिपादकभावलक्षणं प्रवृत्तिनिवृत्तिरूपं वा। वाक्काययोजितं वाक्कायाभ्यां योजितं सम्पादितं। केन सह? मनसा सह मनस्यारोपितं व्यवहारं त्यजेत् चित्तेन न चिन्तयेत्॥

अर्थ—अंतरात्म्यानें त्यागही अंतरंग वस्तूचाच करावयाचा व ग्रहणही अंतरंगवस्तूचेंच करावयाचें, असें जें वरील श्लोकांत सांगितलें आहे; त्याबद्दल तो त्याग व ग्रहण हें कसें करावयाचें त्या संबंधानें सांगतात—त्याग करण्याविषयीं व ग्रहण करण्याविषयीं प्रवृत्त झालेल्या त्या अंतरात्म्यानें मनाशीं आपला योग करावा. म्हणजे, आपल्या अंतर्ज्ञानानें "मीच मन आहे" असा निश्चय करावा. आणि वाणी व शरीर ह्यांच्यापासून आपलें वियोजन करावें अर्थात् वाणी आणि शरीर ह्यांच्याविषयीं "मी बोलतों, मी चालतों" इत्यादि प्रकारचा आत्म्याच्या अभेदाचा आग्रह उत्पन्न झालेला असतो, म्हणजे, 'शरीर हेंच आत्मा होय' अशी समजूत दृढ झालेली असल्यामुळें, बोलणें चालणें इत्यादि व्यवहार शरीराचे असूनही "मी बोलतों, मी चालतों" असें आपण म्हणत असतों. ह्यांत बोलणें चालणें इत्यादि क्रियांचें वास्तविक कर्तृत्व शरीराकडे येत असून, आत्मा शरीराहून निराळा असल्याचें ज्ञान नसल्यानें

वरील क्रियांचा कर्ता आत्माच आहे, असें जें वाटत असतें, त्याचा त्याग करावा. हें करीत असतां, शरीर आणि वाणी ह्यांच्या योगानें संपादन केलेला जो प्रवृत्त्यात्मक अथवा निवृत्त्यात्मक व्यवहार असेल त्याचाही मनाशीं सहवर्तमान त्याग करावा. ह्यांचें तात्पर्य असें कीं, व्यवहार प्रवृत्त्यात्मक ( करणें ह्या स्वरूपाचा ) व निवृत्त्यात्मक ( न करणें ह्या स्वरूपाचा ) असा दोन प्रकारचा असतो. त्यांत कांहीं व्यवहार शरीरासंबंधानें कल्पिलेला असतो व कांहीं व्यवहार वाणीच्या संबंधानें कल्पिलेला असतो. उदाहरणार्थ—थंडीच्या दिवसांत उबदार कपडे घालणें व उन्हाळ्याच्या दिवसांत ते न घालणें हा प्रवृत्तिनिवृत्त्यात्मक व्यवहार शरीरासंबंधानें कल्पिलेला असतो. व मित्राशीं भाषण करणें व शत्रूंशीं भाषण न करणें हा प्रवृत्तिनिवृत्त्यात्मक व्यवहार वाणीच्या संबंधानें कल्पिलेला असतो. शरीर आणि वाणी ह्या दोहोंहून आत्मा भिन्न आहे असा निश्चय करणाऱ्यानें वर दाखविलेला जो शरीर आणि वाणी ह्या दोहोंच्या योगानें संपादन केलेला वरील तऱ्हेचा प्रवृत्तिनिवृत्तिस्वरूपाचा व्यवहार असेल, त्याचा मनाशीं सह त्याग करावयाचा म्हणजे अर्थातच तो व्यवहार मनांतच येऊं न देणें, त्याचें मनानें चिंतन न करणें हेंच होय. असें अंतरात्म्यानें समजावें.

ननु पुत्रकलत्रादिना सह वाक्कायव्यवहारे सुखोत्पत्तिः प्रतीयते कथं तत्त्यागो युक्त इत्याह—

जगद्देहात्मदृष्टीनां विश्वास्यं रम्यमेव च ॥
स्वात्मन्येवात्मदृष्टीनां क्व विश्वासः क्व वा रतिः ॥४९॥

टीका—देहात्मदृष्टीनां बहिरात्मनां जगत् पुत्रकलत्रादिप्राणिगणो विश्वास्यमवञ्चकं । रम्यमेव च रमणीयमेव प्रतिभाति ॥ स्वात्मन्येव स्वस्वरूपे एवात्मदृष्टीनां अन्तरात्मनां । क्व विश्वासः क्व वा रतिः न क्वापि पुत्रकलत्रादौ तेषां विश्वासो रतिर्वा प्रतिभातीत्यर्थः ॥

अर्थ—पुत्र, स्त्री इत्यादिकांशीं भाषण केलें असतां व शरीर-स्पर्शादिक केलें असतां, त्यापासून सुख होत असलेलें स्पष्टपणें ज्ञात होत असतां, त्यांच्या संबंधाच्या व्यवहाराचा त्याग करणें कसें बरें योग्य होईल? अशा शंकेचें समाधान ह्या श्लोकांत सांगतात. आचार्य म्हणतात—देहालाच आत्मा समजणाऱ्या बहिरात्म्यांना हें सर्व जग विश्वास ठेवण्याला योग्य अर्थात् आपल्याला न फसविणारें आणि प्रेमाला स्थान असें वाटतें. परंतु, आपल्या खऱ्या स्वरूपालाच आत्मा मानणारे जे अंतरात्मे आहेत, त्यांचा विश्वास तरी कोठें असावा व त्यांनीं प्रेम तरी कशावर करावें? तात्पर्य, पुत्र, स्त्री, वगैरे हे आत्मस्वरूपाहून निराळे असल्यानें त्यांना आत्म्याचें खरें

स्वरूप कळलें आहे, त्यांचा विश्वास फक्त आत्म्याच्या स्वरूपा-
वरच असणें साहजिक आहे; व त्यांचें प्रेमही त्याच स्वरूपावर
असणें योग्य आहे. म्हणून त्यांना स्त्रीपुत्रादिकांशीं संभाषणादि-
व्यवहार केल्यानें सुख होत नसल्याकारणानें त्यांनीं त्या
व्यवहाराचा त्याग करणें अगदीं साहजिक आहे. अर्थात्
अंतरात्म्यानें बहिरात्मावस्थेंत वाणी व शरीर ह्यांच्या योगानें
जो प्रवृत्तिनिवृत्तिरूप व्यवहार संपादन केला असेल, त्याचा,
अंतरात्मावस्थेंत त्याग करावा म्हणजे त्या व्यवहाराचें मनांत
मुळींच चिंतन करूं नये, असें वरील श्लोकांत जें सांगितलेलें
आहे तें योग्य आहे असें सिद्ध होतें.

नन्वेवमाहारादावप्यन्तरात्मनः कथं प्रवृत्तिः स्यादित्याह—

**आत्मज्ञानात्परं कार्यं न बुद्धौ धारयेच्चिरम् ॥**
**कुर्यादर्थवशात्किञ्चिद्वाक्कायाभ्यामतत्परः ॥ ५० ॥**

टीका—चिरं बहुतरं कालं बुद्धौ न धारयेत् । किं तत् ? कार्यं । कथम्भूतं ? परमन्यत् । कस्मात् ? आत्मज्ञानात् आत्मज्ञानलक्षणमेव कार्यं बुद्धौ चिरं धारयेदित्यर्थः । परमपि किञ्चिद्वाक्कायाभ्यां कुर्यात् । कस्मात् ? अर्थवशात् स्वपरोपकारलक्षणप्रयोजनवशात् । किंविशिष्टः ? अतत्परस्तदनासक्तः ॥

अर्थ—वरील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आत्मज्ञानी
जीवाचें प्रेम देहादि बाह्य वस्तूवर जर नसतें; असें आहे तर

मग भोजनादिव्यवहाराविषयीं तरी अंतरात्म्याची प्रवृत्ति कशी व्हावी ? ह्या म्हणण्याचें समाधान करतात—अंतरात्म्यानें आत्मज्ञानावांचून दुसरी कोणतीही गोष्ट बुद्धींत चिरकाल राहूं देऊं नये. आत्मज्ञानाचेंच निरंतर चिंतन करावें; असें जरी आहे तथापि आपल्यावर व दुसऱ्यावर उपकार करण्याकरितां कांहीं थोड्या गोष्टी अर्थात् शास्त्रव्याख्यान व भोजन हे व्यवहार त्यांत आसक्ति न ठेवतां वाणी आणि शरीर ह्यांच्या योगानें कराव्यात. अर्थात् आत्मज्ञ जीवाची स्वोपकारार्थ व परोपकारार्थ भोजनादिकांच्या ठिकाणीं प्रवृति होते, असें समजावें.

पुनरात्मज्ञानमेव बुद्धौ धारयेन्न शरीरादिकमित्याह—

**यत्पश्यामीन्द्रियैस्तन्मे नास्ति यन्नियतेन्द्रियः ॥**
**अन्तः पश्यामि सानन्दं तदस्तु ज्योतिरुत्तमम् ॥ ५१ ॥**

टीका—यच्छरीरादिकमिन्द्रियैः पश्यामि तन्मे नास्ति मदीयं रूपं तन्न भवति । तर्हि किं तव रूपं ? तदस्तु ज्योतिरुत्तमं ज्योतिर्ज्ञानमुत्तममतीन्द्रियं । तथा सानन्दं परमप्रसत्तिसद्भूतसुखसमन्वितं । एवंविधं ज्योतिरन्तः पश्यामि स्वसंवेदनेनानुभवामि यत्तन्मे स्वरूपमस्तु भवतु । किंविशिष्टः पश्यामि ! नियतेन्द्रियो नियन्त्रितेन्द्रियः ॥

अर्थ—भोजनादि व्यवहार झाल्यावर पुनः आत्मज्ञानाचेंच चिंतन करावें, शरीरादिकांचें चिंतन करूं नये असें

सांगतात—अंतरात्म्यानें असा विचार करावा कीं, इंद्रियांच्या योगानें ज्या शरीरादि वस्तूंना मी अवलोकन करीत आहे त्या माझ्या नव्हेत. म्हणजे, इंद्रियांनीं समजल्या जाणाऱ्या देहादि वस्तु हें माझें स्वरूप नव्हे. कारण, मी देहाहून निराळा आहे. म्हणून, इंद्रियांचा संयम करून जें आनंदमय असें उत्कृष्ट ज्ञान मी आंत पहात आहे म्हणजे स्वसंवेदनेनें अनुभवीत आहे, तें मला असूं दे. तात्पर्य, अशा विचारानें त्यानें पुनः स्वस्वरूपाचेंच चिंतन करावें.

ननु सानन्दं ज्योतिर्यद्यात्मनो रूपं स्यात्तदेन्द्रियनिरोधं कृत्वा तदनुभवतः कथं दुःखं स्यादित्याह—

सुखमारब्धयोगस्य बहिर्दुःखमथात्मनि ॥
बहिरेवासुखं सौख्यमध्यात्मं भावितात्मनः ॥ ५२ ॥

टीका—बहिर्बाह्यविषये सुखं भवति । कस्य ? आरब्धयोगस्य प्रथममात्मस्वरूपभावनोद्यतस्य । अथ अहो । आत्मनि आत्मस्वरूपे दुःखं तस्य भवति । भावितात्मनो यथावद्विदितात्मस्वरूपे कृताभ्यासस्य । बहिरेव बाह्यविषयेष्वेवासुखं भवति । अथ अहो । सौख्यं अध्यात्मं तस्याध्यात्मस्वरूप एव भवति ॥

अर्थ—आतां आनंदमय ज्ञान हेंच जर आत्म्याचें स्वरूप आहे, तर इंद्रियांचा संयम करून त्या स्वरूपाचा

अनुभव करणाऱ्याला दुःख कां होतें? तें सांगतात—जो जीव नुकतांच आत्मस्वरूपानुभव करूं लागला आहे त्याला बाह्यविषयांतच सुख वाटतें, आणि आत्मस्वरूपांत दुःखच वाटत असतें. आणि ज्यानें आत्मस्वरूपानुभवाचा अभ्यास केला आहे, त्याला बाह्यविषयांत दुःख वाटतें आणि आत्मस्वरूपाचे ठिकाणींच सुख होत असतें.

तद्भावना चेत्थं कुर्यादित्याह—

**तद्ब्रूयात्तत्परान् पृच्छेत्तदिच्छेत्तत्परो भवेत् ॥**
**येनाविद्यामयं रूपं त्यक्त्वा विद्यामयं व्रजेत् ॥ ५३ ॥**

टीका—तत् आत्मस्वरूपं ब्रूयात् परं प्रतिपादयेत् । तदात्मस्वरूपं परान् विदितात्मस्वरूपान् पृच्छेत् । तथा तदात्मस्वरूपं इच्छेत् परमार्थतः सन् मन्येत । तत्परो भवेत् आत्मस्वरूपभावनादरपरो भवेत् । येनात्मस्वरूपेणेत्थम्भावितेन । अविद्यामयं स्वरूपं बहिरात्मस्वरूपं । त्यक्त्वा विद्यामयं रूपं परमात्मस्वरूपं व्रजेत् ॥

अर्थ—आत्मचिंतन कोणत्या प्रकारानें करावें तें सांगतात—ज्या आत्मस्वरूपाच्या योगानें जीव आपलें बहिरात्मत्व टाकून परमात्मस्वरूप होतो, तें आत्मस्वरूप दुसऱ्याला आपण सांगावें, त्या आत्मस्वरूपाचें ज्यांना ज्ञान झालें असेल त्यांना तें विचारावें, तें आत्मस्वरूप वास्तविक

सत्य आहे असें मानावें, आणि त्या आत्मस्वरूपाच्या भावनेविषयीं नेहमीं आदर ठेवावा. ह्याप्रमाणें करणें म्हणजे आत्मचिंतन होय.

ननु वाक्कायव्यतिरिक्तस्यात्मनोऽसम्भवात्तद्ब्रूयादित्याद्ययुक्तमिति वदन्तं प्रत्याह—

शरीरे वाचि चात्मानं सन्धत्ते वाक्शरीरयोः ॥
भ्रान्तोऽभ्रान्तः पुनस्तत्त्वं पृथगेषां निबुध्यति ॥ ५४ ॥

टीका—सन्धत्ते आरोपयति । कं ? आत्मानं । क ? शरीरे वाचि च । कोऽसौ ? वाक्शरीरयोर्भ्रान्तो वागात्मा शरीरमात्मेत्येवं विपर्यस्तो बहिरात्मा । तयोरभ्रान्तो यथावत्स्वरूपपरिच्छेदकोऽन्तरात्मा पुनः एषां वाक्शरीरात्मनां तत्त्वं स्वरूपं पृथक्परस्परभिन्नं बुध्यति निश्चिनोति ॥

अर्थ—शरीर आणि वाणी ह्यांहून निराळा असा आत्मा असणें संभवतच नाहीं, असें असल्यामुळें मागील श्लोकांत आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करावें वगैरे जें सांगितलें आहे तें कसें जुळतें ? अशी शंका करणाऱ्यास आचार्य सांगतात कीं—वाणी आणि शरीर ह्यांनाच आपण समजून भ्रांत झालेला बहिरात्मा, शरीरावर व वाणीवर आत्मत्वाचा आरोप करीत असतो, म्हणजे शरीराला अथवा वाणीलाच आत्मा असें समजतो. आणि ज्याला वाणी आणि शरीर ह्यांच्या

ठिकाणीं आत्मत्वाची भ्रांति नाहीं असा म्हणजे आत्म्याचें खरें स्वरूप जाणणारा असा अंतरात्मा तर त्यांचें ( शरीर, वाणी आणि आत्मा ह्यांचें ) एकमेकांहून भिन्न असलेलें स्वरूप जाणत असतो. शरीर व आत्मा यांच्या भिन्नत्वाची त्याला प्रतीतिच होत असते. म्हणून शरीर आणि वाणी ह्यांच्याहून निराळें असें आत्मस्वरूप नाहीं असें म्हणण्यांत अर्थ नाहीं.

एवमबुध्यमानो मूढात्मा येषु विषयेष्वासक्तचित्तो न तेषु मध्ये किञ्चित्तस्योपकारकमस्तीत्याह—

**न तदस्तीन्द्रियार्थेषु यत् क्षेमङ्करमात्मनः ॥**
**तथापि रमते बालस्तत्रैवाज्ञानभावनात् ॥ ५५ ॥**

टीका—इन्द्रियार्थेषु पञ्चेन्द्रियविषयेषु मध्ये न तत्किञ्चिदस्ति । यत् क्षेमङ्करं । कस्य ? आत्मनः । तथापि यद्यपि क्षेमङ्करं किञ्चिन्नास्ति । रमते रतिं करोति । कोऽसौ ? बालो बहिरात्मा तत्रैव इन्द्रियार्थेष्वेव । कस्मात् ? अज्ञानभावनात् मिथ्यात्वसंस्कारवशात् । अज्ञानं भाव्यते जन्यते येनासावज्ञानभावनो मिथ्यात्वसंस्कारस्तस्मात् ।

अर्थ—आत्मस्वरूपाला जाणत नसलेला बहिरात्मा ज्या " पंचेंद्रियांना गोचर असलेल्या " विषयांचे ठिकाणीं आसक्त होतो, त्यांपैकीं कोणताही विषय त्याचें कल्याण करणारा नसतो असें सांगतात—चक्षु, श्रोत्र, त्वचा, रसना आणि घ्राण ह्या पांच इंद्रियांना विषय होत असलेले जे रूप, शब्द, स्पर्श, रस

आणि गंध हे विषय आहेत, त्यांपैकीं कोणताही विषय आत्म्याचें कल्याण करणारा असा मुळींच नाहीं. असें जरी आहे, तथापि, अनादिकालापासून उत्पन्न झालेल्या मिथ्यात्वाच्या संस्कारामुळें अज्ञानी असलेला असा बहिरात्मा त्या विषयांच्या ठिकाणींच रममाण होतो; म्हणजे आसक्ति दाखवितो.

तथा अनादिमिथ्यात्वसंस्कारे सत्येवम्भूता बहिरात्मानो भवन्तीत्याह—

**चिरं सुषुप्तास्तमसि मूढात्मानः कुयोनिषु ॥**
**अनात्मीयात्मभूतेषु ममाहमिति जाग्रति ॥ ५६ ॥**

टीका—चिरमनादिकालं मूढात्मानो बहिरात्मानः सुषुप्ता अतीव जडतां गताः । केषु ? कुयोनिषु नित्यनिगोदादिचतुरशीतिलक्षयोनिष्वधिकरणभूतेषु । कस्मिन्सति ते सुषुप्ताः ? तमसि अनादिमिथ्यात्वसंस्कारे सति । एवम्भूतास्ते यदि संज्ञित्वमुत्पद्य कदाचिद्दैववशात् बुध्यन्ते तदा ममाहमिति जाग्रति । केषु ? अनात्मीयात्मभूतेषु अनात्मीयेषु परमार्थतोऽनात्मीयभूतेषु पुत्रकलत्रादिषु ममैते इति जाग्रति अध्यवस्यन्ति । अनात्मभूतेषु शरीरादिषु अहमेवैते इति जाग्रति अध्यवस्यन्ति ॥

अर्थ—अनादि अशा मिथ्यात्वाचा संस्कार असल्यानेंच हे जीव अशा प्रकारचे बहिरात्मे झाले आहेत, असें सांगतात—अनादि म्हणजे स्वयंसिद्ध अशा प्रकारचें मिथ्यात्व

असल्यानें हे बहिरात्मे नित्यनिगोदादिक चवऱ्यांशी लक्ष योनींमध्यें उत्पन्न होऊन अगदींच जड म्हणजे अज्ञानी असे झाले आहेत. अर्थात् ह्यांना ही जडता येण्याचें कारण अनादि-मिथ्यात्व हेंच होय. हे जीव त्या मिथ्यात्वामुळेंच आपले नव्हेत अशा स्त्रीपुत्रादिकांविषयीं "हे माझे आहेत" अशी बुद्धि धारण करतात. व आत्मस्वरूपांत नसलेल्या देहादिकांविषयीं 'मीच आहे' अशी समजूत करून घेतात.

ततो बहिरात्मरूपं परित्यज्य स्वपरशरीरमित्थं पश्येदित्याह—

पश्येन्निरन्तरं देहमात्मनोऽनात्मचेतसा ॥
अपरात्मधियाऽन्येषामात्मतत्त्वे व्यवस्थितः ॥ ५७ ॥

टीका—आत्मनो देहमात्मसम्बन्धिशरीरं अनात्मचेतसा ममात्मा न भवतीति बुध्द्या अन्तरात्मा पश्येत् । निरन्तरं सर्वदा । तथा अन्येषां देहं परेषामात्मा न भवतीति बुध्द्या पश्येत् । किंविशिष्टः ? आत्मतत्त्वे व्यवस्थितः आत्मस्वरूपनिष्ठः ॥

अर्थ—मिथ्यात्मामुळें वर सांगितल्याप्रमाणें स्थिति झाली आहे म्हणून, अंतरात्म्यानें बहिरात्म्याचें स्वरूप टाकून देऊन आपलें व दुसऱ्याचें शरीर कसें मानावें तें सांगतात— आत्मस्वरूपांत गढून गेलेल्या अशा अंतरात्म्यानें आपला देह हा आत्मा नव्हे असें सर्वदा समजावें. आणि दुसरे जे बहिरात्मे

जीव आहेत त्यांचे देह, तेही 'आत्मे नव्हेत' असेंच समजावें. तात्पर्य—अंतरात्म्यानें आपल्या अथवा दुसऱ्याच्या अशा कोणत्याही शरीराला आत्मा समजूं नये.

नन्वेवमात्मतत्त्वं स्वयमनुभूय मूढात्मनां किमिति न प्रतिपाद्यते येन तेऽपि न जानन्तीति वदन्तं प्रत्याह—

अज्ञापितं न जानन्ति यथा मां ज्ञापितं तथा ॥
मूढात्मानस्ततस्तेषां वृथा मे ज्ञापनश्रमः ॥ ५८ ॥

टीका—मूढात्मानो मां आत्मस्वरूपं अज्ञापितमप्रतिपादितं यथा न जानन्ति मूढात्मत्वात् तथा ज्ञापितमपि मां ते मूढात्मत्वादेव न जानन्ति । ततः सर्वथापरिज्ञानाभावात् तेषां मूढात्मनां सम्बन्धित्वेन वृथा मे ज्ञापनश्रमः विफलो मे तत्प्रतिपादनप्रयासः ॥

अर्थ—आत्मस्वरूपाचा स्वतः अनुभव घेऊन त्याचा दुसऱ्या अज्ञानी जीवांना कां उपदेश करीत नाहीं ? कारण, तेही आत्मस्वरूपाला न जाणणारे असेच आहेत, असा प्रश्न करणाऱ्यास आचार्य सांगतात—हे मूढात्मे ज्याप्रमाणें आत्मस्वरूप न सांगितल्यामुळें जाणत नाहींत, त्याचप्रमाणें आत्मस्वरूप सांगितलें असतांही तें त्यांना समजत नाहीं. म्हणून, त्यांना समजून देण्याकरितां श्रम करणें व्यर्थ आहे.

यद् बोधयितुमिच्छामि तन्नाहं यदहं पुनः ॥
ग्राह्यं तदपि नान्यस्य तत्किमन्यस्य बोधये ॥ ५९ ॥

टीका—यत् विकल्पाधिरूढमात्मस्वरूपं देहादिकं वा बोधयितुं ज्ञापयितुमिच्छामि, तन्नाहं तत्स्वयं नाहमात्मस्वरूपं परमार्थतो भवामि। यदहं पुनः यत्पुनरहं चिदानन्दात्मकं स्वसंवेद्यमात्मरूपं। तदपि ग्राह्यंनान्यस्य स्वसंवेदनेन तदनुभूयते इत्यर्थः। तत्किमन्यस्य बोधये। तत्तस्मात्किं किमर्थं अन्यस्यात्मस्वरूपं बोधयेऽहम् ॥

अर्थ— आत्मज्ञानी जीवानें दुसऱ्यास उपदेश न करण्याचें दुसरें एक कारण आहे. आत्मज्ञानी असें समजतो कीं, कल्पनेंत विषय होणाऱ्या ज्या आत्मस्वरूपाचें अथवा ज्या देहादि विषयाचें ज्ञान दुसऱ्याला करून द्यावें अशी मी इच्छा करतों, तें माझें स्वरूप नव्हे. तात्पर्य, दुसऱ्या जीवाच्या ( श्रोत्याच्या ) ज्ञानांत विषय होणारें जें आत्मस्वरूप तें माझें म्हणजे वक्त्याच्या आत्म्याचें स्वरूप नव्हे. तें त्याच्या ( श्रोत्याच्या ) आत्म्याचें स्वरूप होय. बरें, जें चिदानंदात्मक असें माझें स्वरूप आहे, तें दुसऱ्याला उपदेशानें बोधित करून देतां येत नाहीं. कारण, तें स्वसंवेदनेनें माझें मीच अनुभवावयाचें असल्यानें तें दुसऱ्याच्या अनुभवाचा विषय होत नाहीं. म्हणजे दुसऱ्याला त्याचा अनुभव घेतां

येत नाहीं. मग मी आत्मस्वरूपाचा उपदेश दुसऱ्याला कशाकरितां बरें करावा? मुळींच करण्याचें कारण नाहीं. अशा समजुतीनें आत्मज्ञानी अन्य जीवांना आत्मस्वरूपाचा उपदेश करीत नाहीं.

बोधितेऽपि चान्तस्तत्त्वे बहिरात्मनो न तत्रानुरागः सम्भवति। मोहोदयात्तस्य बहिरर्थ एवानुरागादिति दर्शयन्नाह—

बहिस्तुष्यति मूढात्मा पिहितज्योतिरन्तरे ॥
तुष्यत्यन्तः प्रबुद्धात्मा बहिर्व्यावृत्तकौतुकः ॥ ६० ॥

टीका—बहिः शरीराद्यर्थे तुष्यति प्रीतिं करोति। कोऽसौ मूढात्मा। कथम्भूतः? पिहितज्योतिर्मोहाभिभूतज्ञानः। क? अन्तरे अन्तस्तत्त्वविषये। प्रबुद्धात्मा मोहानभिभूतज्ञानः अन्तस्तुष्यति स्वस्वरूपे प्रीतिं करोति। किंविशिष्टः सन्? बहिर्व्यावृत्तकौतुकः शरीरादौ निवृत्तानुरागः ॥

अर्थ—बहिरात्म्याला आत्मस्वरूपाचा उपदेश करणें व्यर्थ आहे. कारण, त्याला जर आत्मतत्त्वाचा बोध केला, तर त्याचें प्रेम त्या विषयावर आत्मस्वरूपावर उत्पन्नच होत नाहीं. मोहनीयकर्माच्या उदयामुळें बहिरात्म्याचें बाह्यार्थावरच प्रेम असतें असें सांगतात—बहिरात्म्याचें ज्ञान मोहनीयकर्मानें आच्छादित असल्यामुळें तो अज्ञानी बहिरात्मा

अंतस्तत्त्वाला ( आत्मस्वरूपाला ) जाणत नाहीं, आणि बाह्यविषयांवरच प्रेम करतो. त्यामुळें शरीरावर अलंकार वगैरे घालून तो त्याला सुशोभित करीत असतो. आणि अन्तरात्मा हा, बाह्य जे शरीरादि विषय, त्यांच्या विषयींचें त्याचें कौतुक नाहींसें झालें असल्यामुळें अंतस्तत्त्वावरच ( आत्मस्वरूपावरच ) प्रेम करतो; ह्यावरूनही बहिरात्म्याला आत्मोपदेश करणें व्यर्थ आहे हेंच सिद्ध होतें.

कुतोऽसौ शरीरादिविषये निवृत्तभूषणमण्डनादिकौतुक इत्याह—

**न जानन्ति शरीराणि सुखदुःखान्यबुद्धयः ॥**
**निग्रहानुग्रहधियं तथाप्यत्रैव कुर्वते ॥ ६१ ॥**

टीका—सुखदुःखानि न जानन्ति । कानि? शरीराणि जडत्वात् अबुद्धयो बहिरात्मानः । तथापि यद्यपि न जानन्ति तथापि । अत्रैव शरीरादावेव कुर्वते । कां? निग्रहानुग्रहधियं द्वेषवशादुपवासादिना शरीरादेः कदर्थनाभिप्रायो निग्रहबुद्धिं रागवशात्कटककटिसूत्रादिना भूषणाभिप्रायोऽनुग्रहबुद्धिम् ॥

अर्थ— शरीरादिकांना अलंकृत करण्याचें कौतुक अंतरात्म्याला कां असत नाहीं? ह्याचें कारण ह्या श्लोकांत दाखविलें आहे. शरीरें हीं जड असल्यामुळें तीं सुखदुःखाला जाणत नाहींत. म्हणजे, त्यांना सुखदुःखांचें ज्ञान असत नाहीं.

असें जरी आहे, तथापि, मूढ असे बहिरात्मे हे शरीराविषयीं द्वेष उत्पन्न झाला असतां त्यांना उपवासादिकांच्या योगानें त्रास देऊन दंड करतात. आणि त्यांच्यावर प्रेम उत्पन्न झालें असतां त्यांना अलंकार वगैरे घालून सुशोभितही करतात. तात्पर्य—शरीराला अचेतनत्व असल्यानें त्याला सुखदुःखाचें ज्ञान असत नाहीं. म्हणून अंतरात्मे हे शरीराला अलंकार वगैरे घालीत नाहींत. शरीराला अलंकृत करणं हें मूर्खाचें काम आहे असें ते समजतात

यावच्च शरीरादावात्मबुध्द्या प्रवृत्तिस्तावत्संसारः तदभावान्मुक्तिरिति दर्शयन्नाह—

स्वबुध्द्या यावद्गृण्हीयात्कायवाक्चेतसां त्रयम् ॥
संसारस्तावदेतेषां भेदाभ्यासे तु निर्वृतिः ॥ ६२ ॥

टीका—स्वबुध्द्या आत्मबुध्द्या यावद्गृण्हीयात् । किं? त्रयं । केषां? कायावाक्चेतसां । सम्बन्धमिति पाठः । तत्र कायवाक्चेतसा त्रयं कर्तृ । आत्मनि यावत्सम्बन्धं गृण्हीयात्स्वीकुर्यादित्यर्थः । तावत्संसारः । एतेषां कायवाक्चेतसां भेदाभ्यासे तु आत्मनः सकाशात् कायवाक्चेतांसि भिन्नानीति भेदाभ्यासे भेदभावनाया तु पुनर्निर्वृतिः मुक्तिः ॥

अर्थ—जोंपर्यंत शरीरादिकांविषयीं 'आत्मा' अशा बुद्धीनें जीवाची प्रवृत्ति असते, तोंपर्यंतच त्याला संसार आहे

असें पुढील श्लोकांत दाखवितात—हा जीव जोंपर्यंत शरीर, वाणी आणि मन ह्या तिघांचें आत्मबुद्धीनें ग्रहण करतो; ह्या तिघांनाही आत्मा असेंच समजतो, तोंपर्यंत त्याला जन्ममरण-रूपी संसार आहे. आणि ह्या तिहींविषयीं "हीं आत्म्याहून निराळीं आहेत" असें मानण्याचा ह्याला अभ्यास झाला, म्हणजे, मोक्षप्राप्ति होते.

शरीरादावात्मनो भेदाभ्यासे च शरीरदृढतादौ नात्मनो दृढतादिकं मन्यते इति दर्शयन् घनेत्यादि श्लोकचतुष्टयमाह—

घने वस्त्रे यथाऽऽत्मानं न घनं मन्यते तथा ॥
घने स्वदेहेऽप्यात्मानं न घनं मन्यते बुधः ॥ ६३ ॥

टीका—घने निबिडावयवे वस्त्रे प्रावृते सति आत्मानं घनं दृढावयवं यथा बुधो न मन्यते । तथा स्वदेहेऽपि घने दृढे आत्मानं घनं दृढं बुधो न मन्यते ॥

अर्थ—शरीर हें आत्म्याहून भिन्न आहे असें समजण्याचा अभ्यास झाला असतां शरीराचा बळकटपणा वगैरे धर्म आत्म्यावर भासत नाहींत असें पुढील चार श्लोकांत सांगतात—ज्याप्रमाणें शहाणा मनुष्य घट्ट वस्त्र पांघरलें असतां शरीरच बळकट झालें असें मानीत नाहीं, म्हणजे, वस्त्रावर असलेल्या बळकटपणाचा आरोप शरीरावर करीत नाहीं;

त्याप्रमाणें, अंतरात्मा हा शरीर दृढ झालें असतां आत्मा दृढ झाला असें मानीत नाहीं. म्हणजे अंतरात्मा हा शरीर बळकट झालें असतां मी बळकट झालों असें म्हणत नाहीं.

जीर्णे वस्त्रे यथाऽऽत्मानं न जीर्णं मन्यते तथा ॥
जीर्णे स्वदेहेऽप्यात्मानं न जीर्णं मन्यते बुधः ॥ ६४ ॥

टीका—जीर्णे पुराणे वस्त्रे प्रावृते यथाऽऽत्मानं बुधो जीर्णं न मन्यते तथा जीर्णे वृद्धे स्वदेहेऽपि स्थितमात्मानं न जीर्णं वृद्धमात्मानं मन्यते बुधः ॥

अर्थ— तसेंच ज्याप्रमाणें शहाणा मनुष्य जीर्ण वस्त्र पांघरलें असतां आपण वृद्ध झालों असें मानीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी जीव देह जरी वृद्ध झाला, तरी आत्मा वृद्ध झाला असें मानीत नाहीं.

नष्टे वस्त्रे यथाऽऽत्मानं न नष्टं मन्यते तथा ॥
नष्टे स्वदेहेऽप्यात्मानं न नष्टं मन्यते बुधः ॥ ६५ ॥

टीका—प्रावृते वस्त्रे नष्टे सति आत्मानं यथा नष्टं बुधो न मन्यते तथा स्वदेहे विनष्टे कुतश्चित्कारणाद्विनाशं गते आत्मानं न नष्टं मन्यते बुधः ॥

अर्थ—पांघरलेलें वस्त्र नाश पावलें असतां शहाणा मनुष्य ज्याप्रमाणें आपण नष्ट झालों असें मानीत नाहीं, त्याप्रमाणें आपला देह कांहीं कारणानें नाश पावला असतां ज्ञानी जीव आत्मा नष्ट झाला असें मानीत नाहीं.

रक्ते वस्त्रे यथाऽऽत्मानं न रक्तं मन्यते तथा ॥
रक्ते स्वदेहेऽप्यात्मानं न रक्तं मन्यते बुधः ॥ ६६ ॥

टीका—रक्ते वस्त्रे प्रावृते सति आत्मानं यथा बुधो न रक्तं मन्यते तथा स्वदेहेऽपि कुसुमादिना रक्ते आत्मानं रक्तं न मन्यते बुधः ॥

अर्थ—रंगलेलें वस्त्र पांघरलें असतां शहाणा मनुष्य ज्याप्रमाणें आपलें शरीर रंगलें आहे असें मानीत नाहीं, त्याप्रमाणें पुष्पादिकांनीं शरीर रंगविलें असतां अंतरात्मा हा आपण रंगलों आहों असें मानीत नाहीं.

एवं शरीरादिभिन्नमात्मानं भावयतोऽन्तरात्मनः शरीरादेः काष्ठादिना तुल्यताप्रतिभासे मुक्तियोग्यता भवतीति दर्शयन्नाह—

यस्य सस्पन्दमाभाति निःस्पन्देन समं जगत् ॥
अप्रज्ञमक्रियाभोगं स शमं याति नेतरः ॥ ६७ ॥

टीका—यस्यात्मनः सस्पन्दं परिस्पन्दसमन्वितं शरीरादिरूपं जगत् आभाति प्रतिभासते । कथम्भूतं ? निःस्पंदेन समं निस्स्पन्देन

काष्ठपाषाणादिना समं तुल्यं । कुतः तेन तत्समं ? अप्रज्ञं जडमचेतनं यतः । तथा अक्रियाभोगं क्रिया पदार्थपरिस्थितिः भोगः सुखाद्यनुभवः तौ न विद्येते यत्र । यस्यैवं सत्प्रतिभासते स किं करोति ? स शमं याति शमं परमवीतरागतां संसारभोगदेहोपरि वा वैराग्यं गच्छति । कथम्भूतं शमं ? अक्रियाभोगमित्येतदत्रापि सम्बन्धनीयम् । क्रिया वाक्कायमनोव्यापारः भोग इन्द्रियप्रणालिकया विषयानुभवनं विषयोत्सवः । तौ न विद्येते यत्र तमित्थम्भूतं शमं स याति । नेतरः न तद्विलक्षणो बहिरात्मा ॥

अर्थ—शरीरादिक हे काष्ठासारखे भासूं लागले म्हणजेच जीवाला मुक्त होण्याची योग्यता येते असें ह्या श्लोकांत दर्शित करतात—ज्या जीवाला क्रिया करणारें असें हें शरीरादिरूप जग; क्रियारहित अशा काष्ठाप्रमाणें ज्ञानशून्य व दगडाप्रमाणें जड तसेंच वस्तूच्या स्थितीनें युक्त नसलेलें ( म्हणजे कोणतीहि क्रिया करणें ज्याचा स्वभाव नव्हे असें ) आणि सुखदुःखाचें ज्ञान ज्याला नाहीं असें भासतें, तो जीव ( अंतरात्मा ), वाणी शरीर आणि मन ह्यांच्या क्रिया व भोग म्हणजे इंद्रियांच्या योगानें विषयांचा अनुभव, अथवा विषयांपासून होणारा आनंद, हे ज्यांत नाहींत असा जो शम ( म्हणजे वीतरागपणा किंवा संसार, विषयभोग व शरीर ह्यांच्याविषयीं वैराग्य ) त्याला प्राप्त होतो. इतर जीव शमाला प्राप्त होत नाहीं. तात्पर्य—शरीर हें काष्ठादिकांप्रमाणें जड आहे, असें ज्याला

वाटतें त्यालाच वैराग्य उत्पन्न होतें. इतराला होत नाहीं. हा क्रम (परम वीतरागता अर्थात् शरीर व विषयोपभोग यांविषयीं वैराग्य उत्पन्न होणें) हें मुक्त जीवाचें पूर्वचिन्ह असल्यानें, हा क्रम ज्याला प्राप्त झाला तोच जीव मुक्त होण्याला योग्य झाला हें अर्थात् सिद्ध होतें. अशी अवस्था अंतरात्म्याची असल्यानें तोच जीव मोक्षाधिकारी समजावा; बहिरात्म्याची स्थिति याच्या उलट असल्यानें तो विषयोपभोगांतच रममाण होतो अतएव मोक्षलक्ष्मी त्याला प्राप्त होत नाहीं.

सोऽप्येवं शरीरादिभिन्नमात्मानं किमिति न प्रतिपद्यत इत्याह—

शरीरकञ्चुकेनात्मा सँवृतज्ञानविग्रहः ॥
नात्मानं बुध्यते तस्माद्भ्रमत्यतिचिरं भवे ॥ ६८ ॥

टीका—शरीरमेव कञ्चुकं तेन संवृतः सम्यक् प्रच्छादितो ज्ञानमेव विग्रहः स्वरूपं यस्य । शरीरसामान्योपादानेऽप्यत्र कार्मणशरीरमेव गृह्यते । तस्यैव मुख्यवृत्त्या तदावरकत्वोपपत्तेः । इत्थम्भूतो बहिरात्मा नात्मानं बुध्यते । तस्मादात्मस्वरूपानवबोधात् अतिचिरं बहुतरकालं भवे संसारे भ्रमति ॥

अर्थ—शरीरादिकांहून भिन्न असलेल्या आत्मस्वरूपाला बहिरात्माही कां जाणत नाहीं तें सांगतात— ज्ञान म्हणजे

शुद्धचैतन्य हें ज्याचें स्वरूप तें कार्मणशरीरानें अत्यंत आच्छादित झालें आहे अतएव हा बहिरात्मा आपल्या खऱ्या स्वरूपाला जाणत नाहीं. त्यामुळेंच हा बहिरात्मा अनंतानंतकालपर्यंत संसारांत फिरत आहे.

यद्यात्मनः स्वरूपमात्मत्वेन बहिरात्मानो न बुध्यन्ते तदा किमात्मत्वेन ते बुध्यन्ते इत्याह—

प्रविशद्गलतां व्यूहे देहेऽणूनां समाकृतौ ॥
स्थितिभ्रान्त्या प्रपद्यन्ते तमात्मानबुद्धयः ॥ ६९ ॥

टीका—तं देहमात्मानं प्रपद्यन्ते । के ते ? अबुद्धयो बहिरात्मानः । कया कृत्वा ? स्थितिभ्रान्त्या । क ? देहे । कथम्भूते देहे व्यूहे समूहे । केषां ? अणूनां परमाणूनां । किंविशिष्टानां प्रविशद्गलतां अनुप्रविशत निर्गच्छतां च । पुनरपि कथम्भूते ? समाकृतौ समानाकारे दृश्यपरापरोत्पादेन आत्मना सहैकक्षेत्रे समानावगाहेन वा । इत्थम्भूते देहे या स्थितिभ्रान्ति स्थित्या कालान्तरस्थायित्वेन एकक्षेत्रावस्थानेन वा भ्रान्तिर्देहात्मनोरभेदा ध्यवसायस्तया ॥

अर्थ—बहिरात्मे हे जर आत्म्याचें खरें स्वरूप जाणत नाहींत, तर, ते आत्मा असें कोणाला समजतात; तें सांगतात—परमाणूंच्या समुदायानें बनलेल्या व आत्म्याशीं सह एका क्षेत्रांत अवगाह करणाऱ्या अशा ह्या शरीराच्या ठिकाणीं तें बरेच दिवस टिकणारें असल्यामुळें, अज्ञानी जीवांना 'हाच आत्मा आहे' असा भ्रम होतो. त्यामुळें ते त्या शरीरालाच आत्मा असें समजतात.

ततो यथावदात्मस्वरूपप्रतिपत्तिमिच्छन्नात्मानं देहाद्भिन्नं भावयेदित्याह—

**गौरः स्थूलः कृशो वाऽहमित्यङ्गेनाविशेषयन् ॥**
**आत्मानं धारयेन्नित्यं केवलज्ञप्तिविग्रहम् ॥ ७० ॥**

टीका— गौरोऽहं स्थूलोऽहं कृशोऽहमित्यनेन प्रकारेणाङ्गेन विशेषणेन विशेषयन् विशिष्टं कुर्वन्नात्मानं धारयेत् चित्तेऽविचलं भावयन् नित्यं सर्वदा। कथम्भूतं? केवलज्ञप्तिविग्रहं केवलज्ञानस्वरूपं। अथवा केवल रूपादिरहिता ज्ञप्तिरेवोपयोग एव विग्रहः स्वरूपं यस्य ॥

अर्थ—आत्म्याच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान व्हावें अशी इच्छा करणाऱ्यानें आत्मा हा शरीराहून भिन्न आहे अशी भावना करावी असें सांगतात—मी गोरा, मी स्थूल, मी कृश (रोडका) अशा प्रकारच्या विशेषणांनीं आत्म्याला युक्त करूं नये. म्हणजे गोरेपणा वगैरे विशेषणें शरीरांचीं असल्यानें तीं आत्म्याचीं आहेत असें समजूं नये. तर, आत्म्याची भावना करतांना तो केवलज्ञानरूपी [ केवलज्ञान हेंच ज्याचें स्वरूप आहे असा अथवा केवल म्हणजे नुसती अर्थात् गोरा रंग वगैरे जिला नाहीं अशी जी ज्ञप्ति (ज्ञान) तीच आहे स्वरूप ज्याचें असा ] आहे, अशाच त्याची नेहमीं भावना करावी.

यश्चैवंविधमात्मानमेकाग्रमनसा भावयेत्तस्यैव मुक्तिर्नान्यस्येत्याह—

**मुक्तिरेकान्तिकी तस्य चित्ते यस्यचला धृतिः ॥**
**तस्य नैकान्तिकी मुक्तिर्यस्य नास्त्यचला धृतिः ॥ ७१ ॥**

टीका—एकान्तिकी अवश्यम्भाविनी तस्यान्तरात्मनो मुक्तिः। यस्य चित्ते अचला अविचला धृतिः आत्मस्वरूपधारणं स्वरूपविषया प्रसक्तिर्वा। यस्य तु चित्ते नास्त्यचला धृतिस्तस्य नैकान्तिकी मुक्तिः ॥

अर्थ—जो अशा प्रकारच्या आत्म्याचें एकाग्रमनानें चिन्तन करतो त्यालाच मोक्ष प्राप्त होतो, इतराला होत नाहीं, असं सांगतात—ज्याच्या चित्तांत वर सांगितलेल्या प्रकारच्या आत्मस्वरूपाची निश्चळ भावना असेल, त्यालाच (अंतरात्म्यालाच) निश्चयानें मोक्ष प्राप्त होतो. आणि ज्याच्या चित्तांत वशी म्हणजे आत्मा हा ज्ञानस्वरूपी आहे अशी स्थिर भावना नसेल त्याला मोक्षप्राप्ति निश्चयानें होत नाहीं.

चित्तेऽचला धृतिश्च लोकसंसर्गं परित्यज्यात्मस्वरूपस्य संवेदनानुभवे सति स्यान्नान्यथेति दर्शयन्नाह—

**जनेभ्यो वाक्ततः स्पन्दो मनसश्चित्तविभ्रमाः ॥**
**भवन्ति तस्मात्संसर्गं जनैर्योगी ततस्त्यजेत ॥ ७२ ॥**

टीका— जनेभ्यो वाग्वचनप्रवृत्तिर्भवति । ततो वचनप्रवृत्तेः स्पन्दो मनसो व्यग्रता भवति । तस्मान्मनस्स्पन्दाच्चित्तविभ्रमा नाना-विकल्पप्रवृत्तयो भवन्ति । यत एवं ततस्तस्मात् योगी त्यजेत् । कं ? संसर्गं सम्बन्धं । कैः सह ? जनैः ॥

अर्थ—चित्ताची एकाग्रता ही लोकांचा संबंध टाकून, आत्मस्वरूपाच्या संवेदनाचा अनुभव केला तरच होईल, नाहींपेक्षां ती अर्थात् ध्यान होणार नाहीं असें ह्या श्लोकांत दाखवितात—लोकांच्या संसर्गापासून बोलण्याची प्रवृत्ति होते; त्यामुळें मनाची व्यग्रता होते; त्या व्यग्रतेच्या योगानें चित्तविभ्रम म्हणजे मनांत अनेक तरंग किंवा विकल्प उत्पन्न होतात. म्हणून योगी जीवानें अर्थात् आत्मचिंतन करणाऱ्या जीवानें लोकांचा संबंध टाकावा.

तर्हि तैः संसर्गं परित्यज्याटव्यां निवासः कर्तव्य इत्याशङ्कां निराकुर्वन्नाह—

ग्रामोऽरण्यमिति द्वेधा निवासो नात्मदर्शिनाम् ॥
दृष्टात्मनां निवासस्तु विविक्तात्मैव निश्चलः ॥ ७३ ॥

टीका - ग्रामोऽरण्यमित्येवं द्वेधा निवासस्थानं अनात्मदर्शिना-मलब्धात्मस्वरूपोपलम्भानां । दृष्टात्मनामुपलब्धात्मस्वरूपाणां निवासस्तु विमुक्तात्मैव रागादिरहितो विशुद्धात्मैव निश्चलः चित्तव्याकुलतारहितः ॥

अर्थ— वरील श्लोकांत 'आत्मचिंतन करणाऱ्यानें लोकांचा संसर्ग टाकावा' असें सांगितलें; तर मग त्यानें अरण्यवास करावा कीं काय अशा शंकेचा निरास करतात— गांव आणि अरण्य ह्या दोन रहाण्याच्या जागा—ज्यांना आत्मस्वरूपाचें ज्ञान झालेलें नाहीं—त्यांच्या आहेत, म्हणजे हा भेद ज्यांना आत्मदर्शन झालेलें नाहीं त्यांनीं मानावयाचा आहे. आणि ज्यांना आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला आहे त्यांचें वसतिस्थान म्हटलें म्हणजे एक रागादिरहित आणि निश्चल म्हणजे चित्ताच्या व्यग्रतेतें रहित असा आत्माच होय. मग ते कोठेंही राहिले तरी चालतें.

अनात्मदर्शिनो दृष्टात्मनश्च फलं दर्शयन्नाह—

देहान्तरगतेर्बीजं देहेऽस्मिन्नात्मभावना ॥
बीजं विदेहनिष्पत्तेरात्मन्येवात्मभावना ॥ ७४ ॥

टीका— देहान्तरे भवान्तरे गतिर्गमनं तस्य बीजं कारणं किं ? आत्मभावना । क्व ? देहेऽस्मिन् अस्मिन् कर्मवशाद्गृहीते देहे । विदेहनिष्पत्तेः विदेहस्य सर्वथा देहत्यागस्य निष्पत्तेर्मुक्तिप्राप्तेर्बीजं स्वात्मन्येवात्मभावना ॥

अर्थ—आत्मज्ञान न होणें आणि होणें ह्यांचें फळ सांगतात—कर्माच्या आधीनतेमुळें प्राप्त झालेल्या देहाच्या

ठिकाणीं आत्मभावना करणें म्हणजे वर्तमानकालीं प्राप्त झालेल्या शरीरालाच आत्मा असें मानणें हें पुढें दुसऱ्या शरीराची प्राप्ति होण्याचें साधन आहे. आणि शुद्ध अशा आत्मस्वरूपावर आत्मभावना करणें हें देहापासून मुक्त होण्याचें अर्थात् मोक्षप्राप्तीचें साधन आहे, असें समजावें. तात्पर्य—आत्मज्ञान न होण्यानें संसाराची प्राप्ति होते आणि आत्मज्ञान झालें असतां मोक्षप्राप्ति होते.

कश्चिद्गुरुर्भविष्यतीति वदन्तं प्रत्याह—

नयत्यात्मानमात्मैव जन्म निर्वाणमेव च ॥
गुरुरात्मात्मनस्तस्मान्नान्योऽस्ति परमार्थतः ॥ ७५ ॥

टीका— जन्म संसारं नयति प्रापयति । कं ? आत्मानं । कोऽसौ आत्मैव देहादौ दृढात्मभावनावशात् । निर्वाणमेव च आत्मानमात्मैव नयति स्वात्मन्येवात्मबुद्धिप्रकर्षसद्भावात् । यत एवं तस्मात्परमार्थतो गुरुरात्माऽऽत्मनः । नान्यो गुरुरस्ति परमार्थतः । व्यवहारेण तु यदि भवति तदा भवतु ॥

अर्थ—आत्मज्ञान होण्याला कोणी तरी गुरु पाहिजे असें म्हणणाऱ्यांना आचार्य सांगतात—आत्मा हाच शरीरादिकांवर दृढ अशा प्रकारची आत्मभावना करूं लागला म्हणजे, तो आपल्यालाच जन्ममरणरूपी संसारांत पाडतो.

आणि तोच शुद्धात्मस्वरूपाच्या ठिकाणीं आत्मभावना करूं लागला म्हणजे आपल्यालाच निर्वाणप्राप्ति करून देतो. म्हणून वास्तविक विचार केला असतां, आत्मा हाच आपला स्वत:चा गुरु होय. दुसरा कोणीहि गुरु नाहीं. आतां व्यवहारांत दुसरा गुरु पाहिजे असें पाहिजे तर म्हणावें. पण वस्तुत: आत्मा हा आपला आपणच गुरु आहे.

देहे स्वबुद्धिर्मरणोपनिपाते किं करोतीत्याह—

दृढात्मबुद्धिर्देहादावुत्पश्यन्नाशमात्मनः ॥
मित्रादिभिर्वियोगं च बिभेति मरणाद्भृशम् ॥ ७६ ॥

टीका—देहादौ दृढात्मबुद्धिरविचलात्मदृष्टिर्बहिरात्मा । उत्पश्यन्नवलोकयन् । आत्मनो नाशं मरणं मित्रादिभिर्वियोगं च मम भवति इति बुध्यमानो मरणाद्बिभेति भृशमत्यर्थम् ॥

अर्थ—देहालाच आत्मा समजणारा बहिरात्मा मरण प्राप्त झालें असतां काय करतो तें सांगतात—देह हाच आत्मा होय अशी ज्याची दृढबुद्धि झाली आहे असा हा बहिरात्मा आपल्याला मरण प्राप्त झालेलें पाहून, आतां मित्रादिकांशीं आपला वियोग होणार असें मनांत आणून, तो मृत्यूला फारच भितो.

यस्तु स्वात्मन्येवात्मबुद्धिः स मरणोपनिपाते किं करोतीत्याह—

**आत्मन्येवात्मधीरन्यां शरीरगतिमात्मनः ॥**
**मन्यते निर्भयं त्यक्त्वा वस्त्रं वस्त्रान्तरग्रहम् ॥ ७७ ॥**

टीका—आत्मन्येवात्मस्वरूप एव आत्मधीः अन्तरात्मा शरीरगतिं शरीरविनाशं शरीरपरिणतिं वा बालाद्यवस्थारूपां आत्मनो अन्यां भिन्नां निर्भयं यथा भवत्येवं मन्यते। शरीरोत्पादविनाशौ आत्मनो विनाशोत्पादौ ( उत्पादविनाशौ इति साधुः ) न मन्यत इत्यर्थः। वस्त्रं त्यक्त्वा वस्त्रान्तरग्रहणमिव ॥

अर्थ— जो शुद्धात्मस्वरूपालाच आत्मा असें समजतो तो अंतरात्मा मरण प्राप्त झालें असतां काय करतो तें सांगतात— शुद्ध अशा आत्मस्वरूपाच्याच ठिकाणीं आत्मबुद्धि धारण करणारा अंतरात्मा, मृत्युकालीं ज्याप्रमाणें हें वस्त्र टाकून दुसरें वस्त्र ग्रहण करावें, त्याप्रमाणें आत्मा हें शरीर टाकून, दुसऱ्या शरीरांत गमन करीत आहे असें निर्भयपणें मानतो. तात्पर्य— तो उत्पत्ति आणि मरण हे विकार आत्म्याला नसून शरीरालाच आहेत असें मानतो. आणि त्यामुळें मरण प्राप्त झालें असतां तो निर्भयही असतो.

एवं च स एव बुध्यते यो व्यवहारेऽनादरपरः। यस्तु तत्रादरपरः स न बुध्यत इत्याह—

व्यवहारे सुषुप्तो यः स जागर्त्यात्मगोचरे ॥
जागर्ति व्यवहारेऽस्मिन् सुषुप्तश्चात्मगोचरे ॥ ७८ ॥

टीका—व्यवहारे विकल्पाभिधानलक्षणे प्रवृत्तिनिवृत्त्यादिस्वरूपे वा सुषुप्तोऽप्रयत्नपरो यः स जागर्त्यात्मगोचरे आत्मविषये संवेदनोद्यतो भवति । यस्तु व्यवहारेऽस्मिन्नुक्तप्रकारे जागर्ति स सुषुप्तः आत्मगोचरे ॥

अर्थ- ह्या श्लोकांत जो व्यवहाराविषयीं अनादर करतो आहे, त्यालाच आत्मस्वरूपाचें ज्ञान होतें इतराला होत नाहीं असें सांगतात—व्यवहारांत ( द्रव्याच्या पर्यायांचें ज्यांत ग्रहण केलें जातें त्याला व्यवहार म्हणतात. जसें, जीवाला मनुष्य, गाय, घोडा वगैरे पर्यायांच्या रूपानें मानणें ) जो सुषुप्त असतो म्हणजे कोणत्याही प्रकारचा यत्न करीत नाहीं, अर्थात् जो पर्यायांचा त्याग करून शुद्ध द्रव्याचेंच ग्रहण करतो, तोच आत्मज्ञानाविषयीं जागृत असतो. म्हणजे तो आत्मस्वरूपाच्या संवेदनेविषयीं यत्न करितो. आणि जो व्यवहारांत जागा असतो म्हणजे द्रव्य सोडून पर्यायांचें ग्रहण करीत असतो, तो आत्मस्वरूपाविषयीं सुषुप्त असतो. अर्थात् तो आत्म्याच्या मनुष्यपर्यायाकडेच पाहणारा असल्यामुळें त्याला खऱ्या आत्मस्वरूपाचें ज्ञान होत नाहीं.

यश्चात्मगोचरे जागर्ति स मुक्तिं प्राप्नोतीत्याह—

आत्मानमन्तरे दृष्ट्वा दृष्ट्वा देहादिकं बहिः ॥
तयोरन्तरविज्ञानादभ्यासादच्युतो भवेत् ॥ ७९ ॥

टीका—आत्मानमन्तरेऽभ्यन्तरे दृष्ट्वा देहादिकं बहिर्दृष्ट्वा तयोरात्मदेहयोरन्तरविज्ञानात् अच्युतो मुक्तो भवेत् । ततोऽच्युतो भवन्नप्यभ्यासाद्भेदज्ञानभावनातो भवति न पुनर्भेदविज्ञानमात्रात् ॥

अर्थ—जो आत्मस्वरूपप्राप्तीविषयीं यत्न करतो, तो मुक्त होतो असें सांगतात—आत्मा हा अंतरंगांत स्वतःच आहे असें मानून, आणि देहादिक सर्व वस्तु बाह्य (परक्या) आहेत असें चिंतन करून, आत्मा आणि शरीर ह्यांच्यामध्यें असलेला भेद पूर्णपणें समजल्यामुळें व भेदज्ञानाच्या सतत अभ्यासामुळें (आत्मा आणि शरीर ह्यांच्या संबंधानें नेहमीं भेदभावना होत असल्यामुळें) अंतरात्मा हा स्वस्वरूपापासून च्युत होत नाहीं. अर्थात् मुक्त होतो.

यस्य च देहात्मनोर्भेददर्शनं तस्य प्रारब्धयोगावस्थायां निष्पन्नयोगावस्थायां च कीदृशं जगत्प्रतिभासत इत्याह—

**पूर्वं दृष्टात्मतत्त्वस्य विभात्युन्मत्तवज्जगत् ॥**
**स्वभ्यस्तात्मधियः पश्चात्काष्ठपाषाणरूपवत् ॥ ८० ॥**

टीका—पूर्वं प्रथमं दृष्टात्मतत्त्वस्य स्वदेहाद्भेदेन प्रतिपन्नात्मस्वरूपस्य प्रारब्धयोगिनः विभात्युन्मत्तवज्जगत् स्वरूपचिन्तनविकलत्वाच्छुभेतरचेष्टायुक्तमिदं जगत् नानाबाह्यविकल्पैरुपेतमुन्मत्तमिव प्रतिभासते । पश्चान्निष्पन्नयोगावस्थायां सत्यां स्वभ्यस्तात्मधियः सुष्टु

भावितमात्मस्वरूपं येन तस्य निश्चलमात्मस्वरूपमनुभवतो जगद्विषय-चिन्ताभावात् काष्ठपाषाणवत्प्रतिभाति । नतु परमौदासीन्यावलम्बात् ।

अर्थ—ज्याला शरीर आणि आत्मा ह्यांच्यामधील भेदाचें ज्ञान झालेलें आहे, त्याला मनाच्या एकाग्रतेचा अभ्यास करण्यास आरंभ करतांना व अभ्यास पूर्ण झाल्यावर हें सर्व जग कसें दिसतें, तें सांगतात—आत्मा हा शरीराहून भिन्न आहे असें ज्याला ज्ञान झालें, त्याला प्रथम हें जग-तें आत्मस्वरूपाचें चिंतन करीत नसल्यामुळें व अशुभ व्यापार करीत असल्यामुळें—खुळ्यासारखें दिसतें. पुढें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं त्याच्या चित्ताची एकाग्रता झाल्यावर, तो त्या जगाचा विचारच करीत नसल्यानें त्याला तें जग काष्ठपाषाणाप्रमाणें दिसतें. ही गोष्ट, त्याच्या ( अंतरात्म्याच्या ) जगाविषयींच्या अत्यंत उदासीनतेमुळें होत नसून बाह्य जगाचें दृश्य स्वरूप त्याच्या मनांत मुळीं येईनासें झालें असल्यामुळेंच होतें.

ननु स्वभ्यस्तात्मधिय इति व्यर्थम् । शरीराद्भेदेनात्मन-स्तत्स्वरूपविभ्द्यः श्रवणात्स्वयं वाऽन्येषां तत्स्वरूपप्रतिपादना-न्मुक्तिर्भविष्यतीत्याशंक्याह—

शृण्वन्नप्यन्यतः कामं वदन्नपि कलेवरात् ॥
नात्मानं भावयेद्भिन्नं यावत्तावन्न मोक्षभाक् ॥ ८१ ॥

टीका—अन्यत उपाध्यायादेः कामं अत्यर्थं शृण्वन्नपि कलेवरा-द्भिन्नमाकर्णयन्नपि ततो भिन्नं तं स्वयमन्यान् प्रति वदन्नपि यावत्कलेवरा-द्भिन्नमात्मानं न भावयेत् तावन्न मोक्षभाक् मोक्षभाजनं तावन्न भवेत् ॥

अर्थ—मागील श्लोकांत "स्वभ्यस्तात्मधियः म्हणजे आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं ज्याच्या चित्ताची एकाग्रता झाली आहे" असें म्हटलें आहे तें योग्य नाहीं. कारण, आत्मा हा शरीराहून निराळा आहे असें आत्मज्ञानी लोकांच्या तोंडून ऐकलें असतां, किंवा आपण दुसऱ्या लोकांना तसा उपदेश केला असतांही, आत्मा शरीराहून भिन्न आहे ही गोष्ट समजली असल्यानें मोक्ष होण्यास काय हरकत आहे? अशी शंका घेणाऱ्याला आचार्य सांगतात—आत्मा शरीराहून भिन्न आहे असें ऐकून व दुसऱ्याला सांगूनहि जोंपर्यंत तशी भावना केलेली नाहीं, तोंपर्यंत तो जीव मुक्त होण्याला पात्र होत नाहीं. म्हणून एकाग्र चित्तानें मी शरीराहून भिन्न आहें अशी भावना नेहमीं अवश्य केली पाहिजे.

तद्भावनायां च प्रवृत्तोऽसौ किं कुर्यात्?

**तथैव भावयेद्देहाद्व्यावृत्यात्मानमात्मनि ॥**
**यथा न पुनरात्मानं देहे स्वप्नेऽपि योजयेत् ॥ ८२ ॥**

टीका—देहाद्व्यावृत्य शरीरात्पृथक्कृत्वा आत्मानं स्वस्वरूपं आत्मनि स्थितं तथैव भावयेत् शरीराद्भेदेन दृढतरभेदभावनाप्रकारेण भावयेत् । यथा पुनः स्वप्ने स्वप्नावस्थायां देहे उपलब्धेऽपि तत्र आत्मानं न योजयेत् देहमात्मतया नाध्यवस्येत् ॥

अर्थ—आत्मभावना करावयास तयार झालेल्यानें काय करावें तें सांगतात—आत्मस्वरूप शरीराहून निराळें करून त्याची भावना आपल्याच ( आत्म्याच्याच ) ठिकाणीं करावी. ती इतकी दृढ होऊं द्यावी कीं, जिच्या योगानें स्वप्नांत देखील " शरीर आत्मा आहे " असें आपल्याला वाटणार नाहीं.

यथा परमौदासीन्यावस्थायां स्वपरविकल्पस्त्याज्यस्तथा व्रतविकल्पोऽपि । यतः —

अपुण्यमव्रतैः पुण्यं व्रतैर्मोक्षस्तयोर्व्ययः ॥
अव्रतानीव मोक्षार्थी व्रतान्यपि ततस्त्यजेत् ॥ ८३ ॥

टीका—अपुण्यमधर्मः अव्रतैर्हिंसादिविकल्पैः परिणतस्य भवति । पुण्यं धर्मो व्रतैः अहिंसादिविकल्पैः परिणतस्य भवति । मोक्षः पुनस्तयोः पुण्यापुण्ययोर्व्ययो विनाशो मोक्षः । यथैव हि लोहशृङ्खला बन्धहेतुस्तथा सुवर्णशृङ्खलाऽपि । अतो यथोभयशृङ्खलाभावाद्व्यवहारे मुक्तिस्तथा परमार्थेऽपीति । ततस्तस्मान्मोक्षार्थी अव्रतानीव इवशब्दो यथार्थः यथाऽव्रतानि त्यजेत्तथा व्रतान्यपि ॥

अर्थ—आतां ज्याप्रमाणें अत्यंत उदासीन अवस्थेंत स्वपरभाव सोडावयाचा असतो, त्याप्रमाणेंच आत्मनिष्ठ जीवानें अनेक प्रकारचीं व्रतें करण्याचेंही सोडावें लागतें असें ह्या श्लोकांत दाखवितात—व्रतें नव्हेत असे जे हिंसा वगैरे व्यापार, ते केल्यानें करणाऱ्याला पापाचा बंध होतो, अहिंसा वगैरे व्रतें

केल्यानें पुण्याचा बंध होतो, आणि पुण्यपाप ह्या दोहोंचा नाश झाल्यानें मोक्षाची प्राप्ति होते. कारण, ज्याप्रमाणें लोखंडाची बेडी बंधन करते त्याचप्रमाणें सुवर्णाची जरी बेडी असली, तथापि ती बेडीच असल्यानें बंधन करते. म्हणून दोन्ही प्रकारची बेडी नसली म्हणजेच जसा व्यवहारांत मनुष्य बद्ध होत नाहीं, अर्थात् मोकळा-स्वतंत्र-असतो त्याप्रमाणें पापपुण्य हीं दोन्हीं कर्मंच असल्यानें त्यांपासून जीवाला बंधच होतो. म्हणून त्या दोहोंचाही किंबहुना संपूर्ण कर्मांचा नाश झालाच मोक्ष असें समजावयाचें आहे. ह्याकरितां मुमुक्षु अशा भव्यजीवानें ( अंतरात्म्यानें ) अव्रतांचा म्हणजे हिंसादि-व्यापारांचा जसा त्याग करावयाचा तसाच व्रतांचाही त्याग करावा.

कथं तानि त्यजेदिति तेषां त्यागक्रमं दर्शयन्नाह—

अव्रतानि परित्यज्य व्रतेषु परिनिष्ठितः ॥
त्यजेत्तान्यपि सम्प्राप्य परमं पदमात्मनः ॥ ८४ ॥

टीका— अव्रतानि हिंसादीनि परित्यज्य व्रतेषु परिनिष्ठितो भवेत् । पश्चात्तान्यपि त्यजेत् । किं कृत्वा ? सम्प्राप्य । किं तत् ? परमं पदं परमवीतरागतालक्षणं क्षीणकषायगुणस्थानं । कस्य तत्पदं ? आत्मनः ॥

अर्थ—त्या त्यागाचा क्रम सांगतात—हिंसादिक जीं अव्रतें त्यांचा त्याग करून, व्रतें करण्यांत स्थिर झालेल्यानें (अंतरात्म्यानें) उत्कृष्ट असें वीतरागताळक्षणाचें क्षीणकषाय नांवाचें गुणस्थान (१२ वें गुणस्थान) प्राप्त झालें असतां म्हणजे आत्मा वीतराग झाला असतां त्या व्रतांचाही त्याग करावा.

कुतोऽव्रतविकल्पत्यागे परमपदप्राप्तिरित्याह—

यदन्तर्जल्पसम्पृक्तमुत्प्रेक्षाजालमात्मनः ॥
मूलं दुःखस्य तन्नाशे शिष्टमिष्टं परं पदम् ॥ ८५ ॥

टीका—यदुत्प्रेक्षाजालं । कथम्भूतं ? अन्तर्जल्पसम्पृक्तं अन्तर्वचनव्यापारोपेतं आत्मनो दुःखस्य मूलं कारणं । तन्नाशे तस्योत्प्रेक्षाजालस्य विनाशे । इष्टमभिलषितं यत्पदं तच्छिष्टं प्रतिपादितम् ॥

अर्थ—अनेकप्रकारच्या अव्रतांचा त्याग केला असतां, परमपद प्राप्त होतें ही गोष्ट कशी संभवते तें सांगतात—मनांत शब्दस्फूर्ति होऊन जे अनेक प्रकारचे विकल्प (कल्पनातरंग) उठतात व जे विकल्प कोणी नसतांनासुद्धां आंतल्याआंत संभाषण करतात; अथवा वाऱ्याबरोबरच विचारविनिमय करतात तेच आत्म्याला दुःख देण्याला मूळकारण आहेत. म्हणून ह्या अंतर्वचन व्यापारमय कल्पनाचक्रांचा नाश झाल्यानें जें अवशिष्ट शुद्ध चैतन्य राहतें, तेंच इष्ट व परमप्रिय असें

परमपद म्हणजे आत्म्याचें खरें स्वरूप होय. व या परमपदाची प्राप्ति वर सांगितलेले कल्पनातरंग नष्ट झाल्यामुळेंच होते. या ठिकाणीं मनांत शब्दांची स्फूर्ति होऊन जे कल्पनातरंग उठतात त्यांचीही गणना अव्रतांत केली आहे असें समजावें.

तस्य चोत्प्रेक्षाजालस्य नाशं कुर्वाणोऽनेन क्रमेण कुर्यादित्याह—

अव्रती व्रतमादाय व्रती ज्ञानपरायणः ॥
परात्मज्ञानसम्पन्नः स्वयमेव परो भवेत् ॥ ८६ ॥

टीका—अव्रतित्वावस्थाभाविविकल्पजालं व्रतमादाय विनाशयेत् । व्रतित्वावस्थाभावि पुनर्विकल्पजालं ज्ञानपरायणो ज्ञानभावनानिष्ठो भूत्वा परमवीतरागतावस्थायां विनाशयेत् । सयोगिजिनावस्थायां परात्मज्ञान-सम्पन्नः परं सकलज्ञानेभ्य उत्कृष्टं तच्च तदात्मज्ञानं च केवलज्ञानं तेन सम्पन्नो युक्तः स्वयमेव गुर्वाद्युपदेशानपेक्षः परः सिद्धस्वरूप आत्मा भवेत् ॥

अर्थ—वर सांगितलेल्या कल्पनातरंगांचा त्याग करणें तो पुढील क्रमानें करावा असें सांगतात—व्रतरहित असलेल्यानें व्रतें धारण करून, व्रतरहित असलेल्या अवस्थेंत उत्पन्न होत असलेल्या वर सांगितलेल्या कल्पनांचा ( संकल्प-विकल्पांचा ) त्याग करावा. व्रती असलेल्यानें ज्ञानपरायण होऊन ( ज्ञान-

भावनेंत आसक्त राहून अर्थात् वीतराग होऊन ) व्रती असतांना ज्या कल्पना उत्पन्न होत असतील त्यांचा त्याग करावा. मग सयोगिजिनावस्थेंत उत्कृष्ट अशा प्रकारचें जें आत्मज्ञान म्हणजे केवलज्ञान, त्यानें युक्त होऊन, आपणच ( गुरू वगैरेंच्या उपदेशाची अपेक्षा न करतां ) सिद्धस्वरूप व्हावें; अर्थात् मोक्षलक्ष्मीस वरावें.

यथा च व्रतविकल्पो मुक्तेर्हेतुर्न भवति तथा लिंगविकल्पोऽपीत्याह—

लिंगं देहाश्रितं दृष्टं देह एवात्मनो भवः ॥
न मुच्यन्ते भवात्तस्मात्ते ये लिङ्गकृताग्रहाः ॥ ८७ ॥

टीका—लिंगं जटाधारणनग्नत्वादि देहाश्रितं दृष्टं शरीरधर्मतया प्रतिपन्नं । देह एवात्मनो भवः संसारः । यत एवं तस्माद्ये लिंगकृताग्रहाः लिंगमेव मुक्तेर्हेतुरितिकृताभिनिवेशास्ते न मुच्यन्ते । कस्मात् ? भवात् ॥

अर्थ—ज्याप्रमाणें अनेकप्रकारचीं व्रतें हीं मोक्षाला साधक नाहींत त्याप्रमाणें शरीरावर अनेकप्रकारचीं चिन्हें धारण करणें हेंही मोक्षाचें साधन नव्हे, हें ह्या श्लोकांत दाखवितात– कोणतेंही चिन्ह ( जटा धारण करणें, नग्न असणें वगैरे वेष ) हें देहाश्रित म्हणजे देहावरच दृष्टी पडून असतें. आणि आत्म्याला देहप्राप्ति होणें ह्यालाच संसार असें म्हणतात.

अर्थात चिन्हांचा-लिंगांचा-आत्म्याशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नसल्यानें जटा वगैरे चिन्हें धारण करण्याविषयीं आग्रह करणारे जीव संसारापासून मुक्त होत नाहींत. उलट शरीरधर्मावर विश्वास ठेवल्यानें ते पुनः संसारांतच पडतात.

येऽपि वर्णानां ब्राह्मणो गुरुरतः स एव परमपदयोग्य इति वदन्ति तेऽपि न मुक्तियोग्या इत्याह—

जातिर्देहाश्रिता दृष्टा देह एवात्मनो भवः ॥
न मुच्यन्ते भवात्तस्माद्ये ते जातिकृताग्रहाः ॥ ८८ ॥

टीका—जातिर्ब्राह्मणादिर्देहाश्रितेत्यादि सुगमम् ॥

अर्थ-'ब्राह्मण हा सर्व वर्णांचा गुरु होय' असें शास्त्रांत सांगितलें असल्यानें ब्राह्मणजातीचा मनुष्यच मोक्ष-प्राप्ति होण्याला योग्य समजावा, असें म्हणणारे ते लोकही मुक्त होण्याला योग्य नाहींत असें सांगतात- चिन्हांप्रमाणेंच ब्राह्मणादि जाति ही देखील देहाचा आश्रय करणारीच आहे, म्हणजे जाति ही सुद्धां शरीराचाच धर्म आहे. आत्म्याला जात नाहीं आणि आत्म्याला शरीराची प्राप्ति होणें हाच संसार आहे. म्हणून शरीराशींच ज्याचा संबंध येतो अशा जातीबद्दल जे आग्रह धरून बसले आहेत तेही संसारापासून मुक्त होण्याला योग्य

नाहींत असें समजावें. जातिभेदाचें अवास्तव स्तोम माजविणाऱ्यांनीं आचार्यांच्या या उपदेशाचें चांगलें मनन करावें. व जातीबद्दलचा खोटा अभिमान सोडावा.

तर्हि ब्राह्मणादिजातिविशिष्टो निर्वाणादिदीक्षया दीक्षितो मुक्तिं प्राप्नोतीति वदन्तं प्रत्याह —

**जातिलिङ्गविकल्पेन येषां च समयाग्रहः ॥**
**तेऽपि न प्राप्नुवन्त्येव परमं पदमात्मनः ॥ ८९ ॥**

टीका—जातिलिंगरूपविकल्पो भेदस्तेन येषां शैवादिनां समयाग्रहः आगमानुबन्धः उत्तमजातिविशिष्टं हि लिंगं मुक्तिहेतुरित्यागमे प्रतिपादितमतस्तावन्मात्रेणैव मुक्तिरित्येवंरूपो येषामागमाभिनिवेशः तेऽपि न प्राप्नुवन्त्येव परमं पदमात्मनः ॥

अर्थ– आतां, जाति किंवा चिन्ह ह्यांच्या योगानें जरी मोक्षप्राप्ति होत नाहीं तरी ब्राह्मणादि जातीनें युक्त असलेल्या मनुष्यानें निर्वाणदीक्षा घेतली असतां तो मुक्त होतो; असें म्हणावें तर त्यावरही दोष सांगतात– जाति आणि दीक्षादि चिन्हें हीं दोन्हीं पाहिजेत अर्थात् हीं दोन असलीं तरच मुक्ति होते; असें ज्यांच्या शास्त्रांत आग्रहानें प्रतिपादन केलेलें आहे, तेही आत्म्याच्या उत्कृष्ट पदाला म्हणजे मोक्षाला प्राप्त होत नाहींत. कारण, जाति आणि दीक्षा ह्या दोन्ही एकत्र जरी

असल्या तथापि त्या दोन्ही शरीराचेच धर्म असल्यानें आत्म्याशीं त्यांचा मुळींच संबंध नाहीं. म्हणून त्यापासून मोक्षप्राप्ति होणें शक्य नाहीं. याप्रमाणें आचार्यांनीं जाति-भेदाचें खंडन करून चिन्हांदि बाह्य अवडंबराचा फोलपणा स्पष्टपणें दाखविला आहे.

तत्पदप्राप्त्यर्थं जात्यादिविशिष्टे शरीरे निर्ममत्वसिध्यर्थं भोगेभ्यो व्यावृत्त्यापि पुनर्मोहवशाच्छरीर एवानुबन्धं प्रकुर्व-न्तीत्याह—

**यत्त्यागाय प्रवर्तन्ते भोगेभ्यो यदवाप्तये ॥**
**प्रीतिं तत्रैव कुर्वन्ति द्वेषमन्यत्र मोहिनः ॥ ९० ॥**

टीका—यस्य शरीरस्य त्यागाय निर्ममत्वाय भोगेभ्यः स्त्रग्वनितादिभ्यो निवर्तन्ते । तथा यदवाप्तये यस्य परमवीतरागत्वस्यावाप्तये प्राप्तिनिमित्तं भोगेभ्यो निवर्तन्ते । प्रीतिमनुबन्धं तत्रैव शरीरे एव कुर्वन्ति । द्वेषं पुनरन्यत्र वीतरागत्वे । के ते ? मोहिनो मोहवन्तः ॥

अर्थ— मागील तीन श्लोकांत ज्यांच्या मतांचें खंडन केलें आहे, त्या मतांचे लोक त्या मोक्षपदाची प्राप्ति होण्या-करितां जात्यादिकांनीं युक्त असलेल्या अशा शरीरावरील ममत्व ( माझेपणा ) नाहींसें व्हावें म्हणून अनेक प्रकारच्या भोगांचा त्याग करतात. पण मोहामुळें पुनः शरीराचाच संबंध करतात; म्हणून त्यांचीं मतें अग्राह्य आहेत असें सांगतात— ज्या शरीरावरील ममत्वाचा नाश व्हावा म्हणून व ज्या

वीतरागत्वाची ( वैराग्याची ) प्राप्ति व्हावी म्हणून हे लोक गंध, माळा, स्त्री वगैरे भोगांपासून परावृत्त होतात, ते त्या शरीरावरच पुनः मोहनीय कर्माच्या उदयामुळें प्रेम करूं लागतात. कारण, जटादि चिन्हें धारण करणें व ब्राह्मणादि जाति असणें हीं मोक्षाचीं साधनें आहेत असें त्यांच्या शास्त्रांत सांगितलें असल्यामुळें त्या साधनांची प्राप्ति करून घेण्याकरितां त्यांना शरीराला जपावें लागतें. त्या योगानें त्या शरीरावर त्यांचें प्रेम उत्पन्न होतें. आणि खऱ्या वीतरागपणावर त्यांचा द्वेष उत्पन्न होतो. हा सर्व खेळ मोहनीयकर्माच्या उदयामुळेंच होत आहे. म्हणून त्यांचीं मतें अग्राह्य होत.

तेषां देहे दर्शनव्यापारविपर्यासं दर्शयन्नाह—

**अनन्तरज्ञः सन्धत्ते दृष्टिं पङ्गोर्यथाऽन्धके ॥**
**संयोगात् दृष्टिमङ्गेऽपि सन्धत्ते तद्वदात्मनः ॥ ९१ ॥**

टीका—अनन्तरज्ञो भेदाग्राहकः पुरुषो यथा पङ्गोर्दृष्टिमन्धके सन्धत्ते आरोपयति । कस्मात्संयोगात् पंग्वन्धयोः सम्बन्धमाश्रित्य । तद्वत् तथा देहात्मनोः संयोगादात्मनो दृष्टिमंगेऽपि सन्धत्ते अंगं पश्यतीति मोहाभिभूतो बहिरात्मा ॥

अर्थ— वर दाखविलेले जे वादी ( भेदाविषयीं आग्रह करणारे ) त्यांची देहाविषयीं भलतीच दृष्टि असते असें सांगतात—

ज्याप्रमाणें पांगळा आणि आंधळा ह्यांच्यामधील भेद न समजणारा मनुष्य त्या दोघांच्या संयोगामुळें पांगळ्याच्या दृष्टीचा आरोप आंधळ्यावर करतो म्हणजे अंधळ्याच्या खांद्यावर पांगळा बसलेला आहे हें न जाणून, पांगळा सांगील त्याप्रमाणें आंधळा चालत असलेला पाहून, एखादा मूर्ख मनुष्य "चालत असलेल्याला दिसवें आहे" असें म्हणतो, त्याप्रमाणें मोहनीयकर्मानें ग्रासलेले असे हे वर सांगितलेले बहिरात्मे शरीर आणि आत्मा ह्यांच्या संयोगामुळें शरीरालाच आत्मा म्हणत आहेत. म्हणून त्यांच्या दृष्टींत (ज्ञानांत) विपर्यास झालेला आहे.

अन्तरात्मा किं करोतीत्याह—

दृष्टभेदो यथा दृष्टिं पंगोरन्धे न योजयेत् ॥
तथा न योजयेद्देहे दृष्टात्मा दृष्टिमात्मनः ॥ ९२ ॥

टीका—दृष्टभेदः पंग्वन्धयोः प्रतिपन्नभेदः पुरुषो यथा पंगोर्दृष्टि-मन्धे न योजयेत् । तथा आत्मनो दृष्टिं देहे न योजयेत् । कोऽसौ ? दृष्टात्मा देहाद्भेदेन प्रतिपन्नात्मा ॥

अर्थ—अंतरात्मा काय करतो तें सांगतात—ज्याप्रमाणें पांगळा आणि आंधळा ह्यांच्यामध्यें असलेल्या भेदाचें ज्याला ज्ञान झालें आहे असा मनुष्य पांगळ्याच्या दृष्टीचा आरोप

आंधळ्यावर करीत नाहीं, त्याप्रमाणे आत्मा आणि शरीर यांच्यामधील भेदाचें ज्ञान असलेला असा हा अंतरात्मा देहावर आत्मबुद्धि ( देह हाच आत्मा अशी समजूत ) ठेवीत नाहीं. अर्थात् अंतरात्म्याला स्वस्वरूपाचें सम्यक् म्हणजे यथार्थ ज्ञान झालेलें असतें.

बहिरन्तरात्मनोः काऽवस्था भ्रान्तिः का वाऽभ्रान्तिरित्याह—

सुप्तोन्मत्ताद्यवस्थैव विभ्रमोऽनात्मदर्शिनाम् ॥
विभ्रमोऽक्षीणदोषस्य सर्वावस्थाऽऽत्मदर्शिनः ॥ ९३ ॥

टीका—सुप्तोन्मत्ताद्यवस्थैव विभ्रमः प्रतिभासते । केषामनात्मदर्शिनां यथावदात्मस्वरूपपरिज्ञानरहितानां बहिरात्मनां । आत्मदर्शिनोऽन्तरात्मनः पुनरक्षीणदोषस्य मोहाक्रान्तस्य बहिरात्मनः सम्बन्धिन्यः सर्वावस्थाः सुप्तोन्मत्ताद्यवस्थावत् जाग्रत्प्रबुद्धानुन्मत्ताद्यवस्थाऽपि विभ्रमः प्रतिभासते यथावद्वस्तुप्रतिभासाभावात् ॥ अथवा सुप्तोन्मत्ताद्यवस्थैव एवकारोऽपिशब्दार्थे तेन सुप्तोन्मत्ताद्यवस्थाऽपि न विभ्रमः । केषां ? आत्मदर्शिनां दृढतराभ्यासात्तदवस्थायामपि आत्मनि तेषामविपर्यासात् स्वरूपसंवित्तिवैकल्यासम्भवाच्च । यदि सुप्ताद्यवस्थायामप्यात्मदर्शनं स्यात्तदा जाग्रदवस्थावत्तत्राप्यात्मनः कथं सुप्तादिव्यपदेश इत्यप्ययुक्तम् । यतस्तत्रेन्द्रियाणां स्वविषये निद्रया प्रतिबन्धात्तद्व्यपदेशो न पुनरात्मदर्शनप्रतिबन्धादिति । तर्हि कस्यासौ विभ्रमो भवति ? अक्षीणदोषस्य बहिरात्मनः कथम्भूतस्य ? सर्वावस्थात्मदर्शिनः सर्वावस्थां बालकुमारादिलक्षणां सुप्तोन्मत्तादिरूपां चात्मेति पश्यत्येवंशीलस्य ॥

अर्थ—बहिरात्मा आणि अंतरात्मा ह्यांना कोणती अवस्था भ्रमात्मक वाटते, आणि कोणती अवस्था प्रमाणात्मक ( खरी ) वाटते तें सांगतात—आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाचें ज्यांना ज्ञान नाहीं अशा बहिरात्म्यांना सुप्तावस्था ( झोंपेची स्थिती ), उन्मत्तावस्था ( वेड लागलेली स्थिति ), स्वप्नावस्था मूर्च्छावस्था ह्या अवस्थाच भ्रमात्मक अशा वाटतात. अर्थात् बहिरात्म्यांना जाग्रदवस्था ही खरी वाटते. आणि आत्मज्ञान ज्याला झालें आहे अशा अंतरात्म्याला ज्याच्या रागादि दोषांचा नाश झालेला नाहीं अशा बहिरात्म्याच्या सर्वच अवस्था भ्रमात्मक वाटतात. अर्थात् बहिरात्म्याची खरी म्हणून मानलेली जाग्रदवस्था ती देखील अंतरात्म्याला भ्रमात्मकच वाटते. कारण, बहिरात्म्याला स्वस्वरूपाचें खरें ज्ञान नसल्यानें तो त्या अवस्थेंतही शरीरालाच आत्मा मानून उन्मत्ताप्रमाणेंच व्यवहार करीत असतो. म्हणून बहिरात्म्याची जाग्रदवस्था देखील अंतरात्म्याला भ्रमात्मकच वाटते. ह्या श्लोकाचा अर्थ दुसऱ्या प्रकारानेंही होतो; तो असा—आत्मज्ञान ज्यांना आहे अशा अंतरात्म्यांना सुषुप्ति-अवस्था, उन्मत्तावस्था वगैरे अवस्थाही भ्रमात्मक नाहींत. म्हणजे, अंतरात्म्यांना स्वस्वरूपसंवेदनेचा फारच दृढ अभ्यास झाला असल्यानें त्यांना वरील अवस्थांमध्येंही आत्मस्वरूपभ्रम होत नाहीं. कारण, त्यांना स्वरूपसंवेदने-

पासून च्युति केव्हांच होत नाहीं. अर्थात् त्याचें आत्म्याच्या स्वरूपाचें ज्ञान यथार्थच असतें. ह्यावर अंतरात्म्याला जर सुप्तावस्थेंतही आत्मसंवेदना होत आहे, तर मग ती अवस्था तरी जाग्रदवस्थेप्रमाणेंच झाली असल्यानें तिला सुषुप्तावस्था असें कां म्हणावें ? अशी शंका करणें योग्य नाहीं. कारण, त्या अवस्थेंत इंद्रियांना निद्रेमुळें आपापले विषय ग्रहण करण्यास प्रतिबंध होत असल्यामुळेंच ह्या अवस्थेला सुषुप्ति ( निद्रा ) अवस्था असें नांव दिलें आहे; आत्मसंवेदनेला प्रतिबंध होतो म्हणून नव्हे. अर्थात् अंतरात्म्याला निद्रावस्थेंतही आत्मसंवेदना होते म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. बहिरात्म्याचें मात्र तसें नाहीं. त्याला निद्रादि अवस्था भ्रमरूप वाटतात. कारण, त्याचे दोष क्षीण झालेले नसतात; आणि तो बाल्य, तारुण्य, वृद्धपणा, निद्रा वगैरे सर्व अवस्थांमध्यें शरीरालाच आत्मा असें समजत असतो. त्यामुळें त्याला निद्रादि अवस्थांत शरीराचें भान होत नसल्यानें त्या अवस्था भ्रमात्मक वाटतात.

ननु सर्वावस्थात्मदर्शिनोऽप्यशेषशास्त्रपरिज्ञानान्निद्रारहितस्य मुक्तिर्भविष्यतीति वदन्तं प्रत्याह—

विदिताशेषशास्त्रोऽपि न जाग्रदपि मुच्यते ।
देहात्मदृष्टिर्ज्ञातात्मा सुप्तोन्मत्तोऽपि मुच्यते ॥ ९४ ॥

टीका—न मुच्यते न कर्मरहितो भवति । कोऽसौ ? देहात्मदृष्टिर्बहिरात्मा । कथम्भूतोऽपि ? विदिताशेषशास्त्रोऽपि परिज्ञाताशेषशास्त्रोऽपि देहात्मदृष्टियतः देहात्मनोर्भेदरुचिरहितो यतः । पुनरपि कथम्भूतोऽपि ? जाग्रदपि निद्रयाऽनभिभूतोऽपि ॥ यस्तु ज्ञातात्मा परिज्ञातात्मस्वरूपः स सुप्तोन्मत्तोऽपि मुच्यते विशिष्टां कर्मनिर्जरां करोति दृढतराभ्यासात्सुप्ताद्यवस्थायामप्यात्मस्वरूपसंवित्यवैकल्यात् ॥

अर्थ—बाल्यादि सर्व अवस्थांत शरीरालाच आत्मा मानणारा असा जीव सर्वशास्त्रांचें ज्ञान झाल्यामुळें निद्रेचा त्याग करून सर्वदा जागृत राहूं लागला म्हणजे तो मुक्त होईल. कारण, त्यानें निद्रेचा त्याग केल्याकारणानें त्याला आतां केव्हांच भ्रम होण्याचें कारण राहिलें नाहीं. असें जर कोणी म्हणेल तर त्याला आचार्य सांगतात—शरीराला आत्मा समजणारा बहिरात्मा सर्वशास्त्र जाणणारा जरी झाला व निद्रेचा त्याग करून तो जागत जरी राहिला, तथापि, तो मुक्त होत नाहीं. कारण, त्याला 'आत्मा देहाहून निराळा आहे.' अशा चिंतनाची गोडी लागलेली नसते. आणि ज्याची आत्मा देहाहून निराळा आहे अशी भावना झालेली असते, तो अंतरात्मा सर्वदा निजून राहिला किंवा उन्मत्त झाला तथापि तो मुक्त होतो. कारण, त्याचा अभ्यास दृढ झाला असल्याकारणानें निद्रावस्थेंतही त्याच्या आत्मस्वरूपाच्या संवेदनेंत कोणत्याही प्रकारची न्यूनता येत नाहीं.

कुतस्तदा तदवैकल्यमित्याह—

**यत्रैवाहितधीः पुंसः श्रद्धा तत्रैव जायते ॥**
**यत्रैव जायते श्रद्धा चित्तं तत्रैव लीयते ॥ ९५ ॥**

टीका—यत्रैव यस्मिन्नेव विषये आहितधीः दत्तावधाना बुद्धिः। "यत्रात्महितधीरिति च पाठः यत्रात्मनो हितमुपकारस्तत्र धीरिति" बुद्धिः कस्य? पुंसः। श्रद्धा रुचिस्तस्य तत्रैव तस्मिन्नेव विषये जायते। यत्रैव जायते श्रद्धा चित्तं तत्रैव लीयते आसक्तं भवति ॥

अर्थ—अंतरात्म्याच्या आत्मसंवेदनेंत झोंपेंतही न्यूनता येत नाहीं असें जें वर सांगितलें त्याचें कारण काय तें सांगतात—मनुष्याची बुद्धि ज्या विषयांत एकाग्र म्हणजे तन्मय झाली असेल, त्याच विषयावर त्याचें श्रद्धान जडतें. आणि ज्या विषयावर श्रद्धान उत्पन्न होतें, त्याच विषयाच्या ठिकाणीं त्याचें चित्त आसक्त होत असतें. म्हणून केव्हांही त्याच्या मनांत दुसरा विषयच येत नसतो. अंतरात्म्याचें तरी आत्मा व देह यांच्या भिन्नत्वाविषयीं असेंच दृढ श्रद्धान झालेलें असतें. म्हणून त्याच्या आत्मसंवेदनेंत केव्हांही न्यूनता येत नाहीं. कारण त्याला आत्म्याचें यथार्थ ज्ञान झालेलें असतें.

क्व पुनरनासक्तं चित्तं भवतीत्याह—

**यत्रानाहितधीः पुंसः श्रद्धा तस्मान्निवर्तते ॥**
**यस्मान्निवर्तते श्रद्धा कुतश्चित्तस्य तल्लयः ॥ ९६ ॥**

टीका—यत्र यस्मिन्विषये अनाहितधीरदत्तावधाना बुद्धिः। यत्रैवाहितधीरिति च पाठः यत्र आहितधीरनुपकारकबुद्धिः। कस्य? पुंसः। तस्माद्विषयात्सकाशात् श्रद्धा निवर्तते। यस्मान्निवर्तते श्रद्धा कुतश्चित्तस्य तल्लयः तस्मिन्विषये लय आसक्तिस्तल्लयः कुतो नैव कुतश्चिदपि ॥

अर्थ—चित्त आसक्त कोठें होत नाहीं तें सांगतात. ज्या वस्तूच्या ठिकाणीं "ही आपल्याला अनुपकारक म्हणजे नुकसान करणारी आहे" अशी मनुष्याची बुद्धि होईल, त्या वस्तूपासून त्याची आवड परतते. आणि ज्या वस्तूपासून आवड परतते अर्थात् ज्याचा तिटकारा वाटतो त्या वस्तूच्या ठिकाणीं चित्ताची आसक्ति कशी असावी? मुळींच असणें शक्य नाहीं.

यत्र च चित्तं विलीयते तध्येयं भिन्नमभिन्नं च भवति तत्र भिन्नात्मनि ध्येये फलमुपदर्शयन्नाह—

**भिन्नात्मानमुपास्यात्मा परो भवति तादृशः ॥**
**वर्तिर्दीपं यथोपास्य भिन्ना भवति तादृशी ॥ ९७ ॥**

टीका—भिन्नात्मानमाराधकात्पृथग्भूतमात्मानमर्हत्सिद्धरूपं उपास्याराध्य आत्मा आराधकः पुरुषः परः परमात्मा भवति तादृशोऽर्हत्सिद्धस्वरूपसदृशः। अत्रैवार्थे दृष्टान्तमाह वर्तिरित्यादि। दीपाद्भिन्ना वर्तिर्यथा दीपमुपास्य प्राप्य तादृशी भवति दीपरूपा भवति ॥

अर्थ—ज्या ठिकाणीं चित्त आसक्त होतें तें ध्येय (वस्तु) आपल्याहून भिन्न आणि अभिन्न असें दोन प्रकारचें असतें. त्यांत ध्येय आपल्याहून भिन्न असल्यास त्याच्या उपासनेचें फळ दाखवितात—ज्याप्रमाणें वात आपल्याहून भिन्न असलेल्या अशा दीपाची उपासना करून आपण दीपस्वरूप होते, त्याप्रमाणें आराधकाच्या आत्म्याहून भिन्न अशा आत्म्याची [अरहंत, सिद्ध वगैरेंची] उपासना केल्यानें उपासक आत्मा हा आपणहि त्या उपास्य आत्म्याप्रमाणें म्हणजे अरहंत वगैरे स्वरूपाचा होतो.

इदानीमभिन्नात्मोपासने फलमाह—

उपास्यात्मानमेवात्मा जायते परमोऽथवा ॥
मथित्वाऽऽत्मानमात्मैव जायतेऽग्निर्यथा तरुः ॥ ९८ ॥

टीका—अथवाऽऽत्मानमेव चित्स्वरूपमेव चिदानन्दमयमुपास्य आत्मा परमः परमात्मा जायते। अमुमेवार्थं दृष्टान्तद्वारेण समर्थयमानः प्राह मथित्वेत्यादि। यथाऽऽत्मानमेव मथित्वा घर्षयित्वा तरुरात्मा तरुस्वत एवाग्निर्जायते ॥

अर्थ—आतां आपल्याहून भिन्न नव्हे अशा आत्म्याच्या उपासनेचें फल सांगतात—ज्याप्रमाणें वृक्ष आपण आपल्याला घांसून स्वतःच अग्निरूप बनतो, त्याप्रमाणें आत्मा आपल्याच चिदानन्दस्वरूपाची उपासना केल्यानें चिदानन्दमय अशा परमात्मस्वरूपाला पावतो. म्हणजे आपणच परमात्मा होतो.

उक्तमर्थमुपसंहृत्य फलमुपदर्शयन्नाह—

**इतीदं भावयेन्नित्यमवाचांगोचरं पदम् ॥**
**स्वत एव तदाप्नोति यतो नावर्तते पुनः ॥ ९९ ॥**

टीका—इति एवमुक्तप्रकारेण इदं भिन्नमभिन्नं चात्मस्वरूपं भावयेत् नित्यं सर्वदा । ततः किं भवति ? तत्पदं मोक्षस्थानं । कथम्भूतं अवाचांगोचरं वचनैरनिर्देश्यं । कथं तत्प्राप्नोति ? स्वत एव आत्मनैव परमार्थतो न पुनर्गुर्वादिबाह्यनिमित्तात् । यतः प्राप्तात् तत्पदान्नावर्तते संसारे पुनर्न भ्रमति ॥

अर्थ—वर दोन श्लोकांत सांगितलेला विषय एकत्र सांगून त्याचें फल सांगतात—ह्याप्रमाणें वर जो भिन्नाभिन्न अशा आत्मोपासनेचा प्रकार सांगितला त्या तऱ्हेनें-मार्गानें सर्वदा तशीच भावना करावी. असें केलें असतां म्हणजे (१) मुमुक्षूच्या आत्म्याहून निराळ्या अशा अर्हंत अथवा सिद्ध परमात्म्याची (२) किंवा स्वतःच्या ठिकाणीं असलेल्या चिदानंद स्वरूप अशा आत्म्याची उपासना केली म्हणजे ज्या पदापासून जीव पुनः ह्या संसारांत केव्हांही येत नाहीं असें व वाणीनें

न सांगतां येण्यासारखें जें सर्वोत्कृष्ट मोक्षपद त्याला हा उपासक आत्मा स्वतःच प्राप्त होतो.

न चासौ तत्त्वचतुष्टयात्मकाच्छरीरात्तत्त्वान्तरभूतः सिद्ध इति चार्वाकाः। सदैवात्मा मुक्तः सर्वदा स्वरूपोपलम्भसम्भवादिति सांख्यास्तान् प्रत्याह—

अयत्नसाध्यं निर्वाणं चित्तत्त्वं भूतजं यदि ॥
अन्यथा योगतस्तस्मान्न दुःखं योगिनां क्वचित् ॥१००॥

टीका—चित्तत्त्वं चेतनालक्षणं तत्त्वं यदि भूतजं पृथिव्यप्तेजोवायुलक्षणभूतेभ्यो जातं यद्यभ्युपगम्यते तदाऽयत्नसाध्यं निर्वाणं यत्नेन तात्पर्येण साध्यं निर्वाणं न भवति। एतच्छरीरपरित्यागेन विशिष्टावस्थाप्राप्तियोग्यस्यात्मन एव तन्मते अभावादित्यात्मनो मरणरूपविनाशादुत्तरकालमभावः। सांख्यमते तु भूतजं सहजं भवनं भूतं शुद्धात्मतत्त्वं तत्र जातं तत्स्वरूपसंवेदकत्वेन लब्धात्मलाभं एवंविधं चित्तत्त्वं यदि तदाऽयत्नसाध्यं निर्वाणं यत्नेन ध्यानानुष्ठानादिना साध्यं न भवति निर्वाणं। सदाशुद्धात्मस्वरूपानुभवे सर्वदैवात्मनो निरुपायमुक्तिप्रसिद्धेः॥ अथवा निष्पन्नेतरयोग्यपेक्षया अयत्नेत्यादिवचनम्। तत्र निष्पन्नयोग्यपेक्षया चित्तत्त्वं भूतजं स्वभावजं। भूतशब्दोऽत्र स्वभाववाची। मनोवाक्कायेन्द्रियैरविक्षिप्तमात्मस्वरूपं भूतं तस्मिन् जातं तत्स्वरूपसंवेदकत्वेन लब्धात्मलाभं एवंविधं चित्तत्त्वं यदि तदाऽयत्नसाध्यं निर्वाणं तथाविधमात्मस्वरूपमनुभवतः कर्मबन्धाभावतो निर्वाणस्याप्रयाससिद्धत्वात्॥ अथवा अन्यथा प्रारब्ध-

योग्यपेक्षया भूतजं चित्तत्वं न भवति तदा योगतः स्वरूपसंवेदनात्मकाचित्त-वृत्तिनिरोधाभ्यासप्रकर्षान्निर्वाणम् ॥ यत एवं तस्मात् क्वचिदप्यवस्थाविशेषे दुर्धरानुष्ठाने छेदनभेदनादौ वा योगिनां दुःखं न भवति । आनन्दात्मक-स्वरूपसंवित्तौ तेषां तत्प्रभवदुःखसंवेदनासम्भवात् ॥

अर्थ—आत्मा हा पृथिव्यादि चार भूतांपासून उत्पन्न झालेल्या शरीराहून निराळा नाहीं असें चार्वाकांचें ( नास्तिकांचें ) म्हणणें आहे. आणि आत्मा हा सर्वदा त्याला स्वस्वरूपाची संवेदना होत असल्यामुळें सर्वदाच मुक्तस्वभाव आहे, असें सांख्य म्हणतात. ह्या दोघांच्याही मताचें खंडन ह्या श्लोकांत केलेलें आहे. तें असें—आत्मा हें तत्व पृथ्वी, जल, तेज आणि वायु ह्या चार भूतांच्या संयोगापासून झालेलें असल्यामुळें ह्या चार भूतांपासून उत्पन्न झालेल्या शरीराहून निराळें नाहीं, असें जर मानिलें; तर, मोक्ष यत्नावांचून साध्य होतो असें मानावें लागेल. कारण, आत्मा हा शरीराहून निराळा नाहीं असें मानणाऱ्या नास्तिकांच्या मतांत ह्या भौतिक शरीराला सोडून एक विशिष्ट अवस्थेची प्राप्ति होण्याला योग्य असा आत्माच मानलेला नाहीं. मरणरूपी जी शरीरनाशाची एक अवस्था आहे, तिच्यानंतर आत्मा हा नाहींसा होतो. अर्थात् मरणानें ह्या भौतिक शरीराचा नाश होणें हीच मुक्ति होय असें असल्यानें व मरण हें स्वाभाविक आहे, म्हणून

मरणाकरितां यत्न करण्याचें प्रयोजन नसल्यामुळें, मोक्ष यत्नावांचून साध्य होतो असें म्हणणें भाग आहे. आम्ही तर मोक्षाकरितां अनेक प्रयत्न वर सांगितले आहेत. म्हणून आम्हांला नास्तिकांना इष्ट असलेलें किंबहुना त्यांनीं सांगितलेलें आत्मस्वरूप मान्य नाहीं. सांख्यमती आत्मतत्त्व हें भूतज (भूतज म्हणजे शुद्ध असें जें आत्मस्वरूप, त्याच्या ठिकाणीं झालेलें अर्थात् शुद्धात्मस्वरूपाच्या संवेदनेनें ज्याला स्वरूपप्राप्ति होत आहे असें) आहे असें म्हणतात. परंतु त्या म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण, तसें मानलें असतां मोक्ष हा यत्नावांचूनच प्राप्त होतो, त्याच्याकरितां ध्यान धारणा वगैरे क्रिया करावयास नकोत असें म्हणावें लागेल. कारण, जीवात्म्याला जर शुद्धात्मस्वरूपाच्या संवेदनेनें जीवात्मत्व येतें. तर त्याला शुद्ध स्वरूपाचा सर्वदा अनुभव होत असल्यानें व शुद्धस्वरूपाचा अनुभव होणें हेंच मोक्षाचें स्वरूप असल्यानें जीवात्मा हा सर्वदा मुक्तच आहे असें होतें. मग त्याला मोक्षाकरितां ध्यानादि अनुष्ठान करण्याचें प्रयोजन नाहीं. अर्थात् प्रयत्नावांचून मोक्ष होतो असें म्हणणें भाग आहे. हा वर सांगितलेल्या अवतरणाच्या अनुरोधानें अर्थ सांगितला. [ हा अर्थ करण्यानें या श्लोकांतील उत्तरार्धाची गति होत नसल्यामुळें टीकाकारांनीं दुसरेंच एक अवतरण योजिलें आहे.

तेंही आम्हीं पुढें लिहिलें आहे. ] आतां दुसऱ्या एका तऱ्हेनें ह्याच श्लोकाचा अर्थ होतो. तो असा—

हा श्लोक आचार्यांनीं—योगप्राप्ति ( एकाग्रतेची सिद्धि ) ज्याला झाली आहे, व ज्यानें एकाग्रतेच्या प्राप्तीकरितां उद्योग आरंभिलेला आहे अशा दोघांच्या संबंधानें—लिहिला आहे असें मानावें. तें असें— आत्मतत्त्व ( अंतरात्म्याचें स्वरूप ) हें जर भूतज ( भूत शब्दाचा अर्थ स्वभाव म्हणजे मन, वाणी, शरीर आणि इंद्रियें ह्यांच्यायोगानें व्यग्रतेला न पावलेलें अर्थात् स्वरूपापासून भ्रष्ट न झालेलें असें शुद्ध आत्मस्वरूप होय. त्यापासून जात म्हणजे उत्पन्न झालेलें अर्थात त्या शुद्धात्मस्वरूपाला जाणणारें असल्यामुळें ज्याला स्वरूपाची म्हणजे जीवपणाची प्राप्ति झाली आहे असें ) आहे, असें जर असेल, तर, मग मोक्ष हा प्रयत्नावांचून सिद्ध होणार आहे. तात्पर्य, बाह्यात्मा हा जर अंतरात्मा झाला असेल तर तो शुद्धात्मस्वरूपाचा नेहमीं अनुभव करणारा असल्यामुळें त्याला कर्मबंध होत नाहीं. आतां जीवाला जर अंतरात्मत्वाची प्राप्ति झाली नसेल तर, त्या जीवाचें स्वरूप भूतज म्हणजे शुद्धात्मस्वरूपाचा अनुभव घेऊन बनलेलें नसल्यामुळें त्याला मोक्ष हा यत्नावांचून मिळणार नाहीं. तर त्याला योगानें म्हणजे स्वरूपसंवेदनरूपी निश्चल चित्तवृत्तीच्या अतिशय

अभ्यासानें मिळणार आहे. असें आहे म्हणून योग्यांना म्हणजे ज्यांना निश्चल चित्तवृत्ति करण्याचा अभ्यास झाला आहे त्यांना ( अंतरात्म्यांना ) व जे तशी चित्तवृत्ति करण्याचा अभ्यास करीत आहेत त्यांना म्हणजे अंतरात्मस्वरूप होऊं लागलेल्यांना कोणत्याही अवस्थेंत म्हणजे भयंकर तपश्चर्या करीत असतां अथवा कोणी त्यांच्या शरीराला छेदभेद करीत असतां, दुःख होत नाहीं. कारण आनंदमय अशा आत्म-स्वरूपाचा अनुभव होत असतां दुःखाची वेदना त्यांना होणें असंभवनीय आहे. म्हणजे ज्याला योगाची ( चित्तैकाग्र्याची ) प्राप्ति झाली आहे तो आत्मस्वरूपानंदांत निमग्न असल्यानें त्याला बाह्य निमित्तानें होणाऱ्या दुःखाची संवेदनाच होत नाहीं. व जो चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास करूं लागलेला आहे, तो त्या सुखाच्या प्राप्तीविषयीं अत्यंतासक्त असल्यानें त्यालाही बाह्यनिमित्तानें दुःख होत नाहीं. म्हणून त्यांना दुःखाची वेदना होणें असंभवनीय आहे असें म्हटलें आहे.

नन्वात्मनो मरणरूपविनाशादुत्तरकालमभावसिद्धेः कथं सर्वदाऽस्तित्वं सिध्येदिति वदन्तं प्रत्याह—

स्वप्ने दृष्टे विनष्टेऽपि न नाशोऽस्ति यथाऽऽत्मनः ॥
तथा जागरदृष्टेऽपि विपर्यासाविशेषतः ॥ १०१ ॥

टीका— स्वप्ने स्वप्नावस्थायां दृष्टे विनष्टेऽपि शरीरादौ आत्मनो यथा नाशो नास्ति तथा जागरदृष्टेऽपि जाग्रदवस्थायां दृष्टे विनष्टेऽपि शरीरादौ आत्मनो नाशो नास्ति। ननु स्वप्नावस्थायां भ्रान्तिवशादात्मनो विनाशः प्रतिभातीति चेत्तदेतदन्यत्रापि समानं। न खलु शरीरविनाशे आत्मनो विनाशमभ्रान्तो मन्यते। तस्मादुभयत्राप्यात्मनो विनाशोऽनुपपन्नो विपर्यासाविशेषात्। यथैव हि स्वप्नावस्थायामविद्यमानेऽप्यात्मनो विनाशे विनाशः प्रतिभासत इति विपर्यासः। तथा जाग्रदवस्थायामपि ॥

अर्थ— शरीराचा मरणरूपी नाश झाल्यावर मग आत्मा असणेंच जर शक्य नाहीं तर त्याचें मोक्षावस्थेंत सर्वदा असणें कसें सिद्ध होणार ? ह्या चार्वाकाच्या ( नास्तिकाच्या ) शंकेचें उत्तर आचार्य ह्या श्लोकांत सांगतात-दृष्ट असें हें शरीर स्वप्नावस्थेंत जरी नाश पावलें, तथापि जसा आत्म्याचा नाश होत नाहीं; त्याप्रमाणेंच जाग्रदवस्थेंतही दिसत असलेलें हें शरीर नाश पावलें तथापि आत्म्याचा नाश होत नाहीं. कारण, दोन्ही अवस्थेंत भ्रम सारखाच आहे. म्हणजे स्वप्नांत जसा शरीराचा नाश झाल्याचा भ्रम होतो, तसेंच जाग्रदवस्थेंतही शरीराला आत्मा मानणें हें भ्रांतीवांचून व्हावयाचें नाहीं. म्हणून दोन्ही अवस्थांत भ्रम सारखाच असल्यामुळें जाग्रदवस्थेंतील शरीराचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश होतो हें म्हणणें जुळत नाहीं. तात्पर्य– स्वप्नावस्थेंत ज्याप्रमाणें

शरीराचा नाश झाला नसतांही तो झाला असा भास होतो, त्याप्रमाणें जाग्रदवस्थेंतही आत्म्याचा नाश होत नसून शरीर मृत झालें असतां आत्म्याचा नाश झाला असें भासतें, तें खरें नव्हे. म्हणून शरीरनाशानंतर आत्म्याचें अस्तित्व मानण्यास कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं. अर्थात् तो मोक्षावस्थेंतही सर्वदा असतो असें मानण्यांत कांहीं दोष नाहीं.

नन्वेवं प्रसिद्धस्याप्यनाद्यनिधनस्यात्मनो मुक्त्यर्थं दुर्धरानुष्ठानक्लेशो व्यर्थो ज्ञानभावनामात्रेणैव मुक्तिसिद्धेरित्याशंक्याह–

अदुःखभावितं ज्ञानं क्षीयते दुःखसन्निधौ ॥
तस्माद्यथाबलं दुःखैरात्मानं भावयेन्मुनिः ॥ १०२ ॥

टीका—अदुःखेन कायक्लेशादिकष्टं विना सुकुमारोपक्रमेण भावितमेकाग्रतया चेतसि पुनः पुनः सञ्चिन्तितं ज्ञानं शरीरादिभ्यो भेदेनात्मस्वरूपपरिज्ञानं क्षीयते अपकृष्यते । कस्मिन्? दुःखसन्निधौ दुःखोपनिपाते सति । यत एवं तस्मात्कारणात् यथाबलं स्वशक्त्यनतिक्रमेण मुनिर्योगी आत्मानं दुःखैर्भावयेत् कायक्लेशादिकष्टैः सदाऽऽत्मस्वरूपं भावयेत् । कष्टसहो भवन्सदाऽऽत्मस्वरूपं चिन्तयेदित्यर्थः ॥

अर्थ—वरील सर्व विवेचनावरून अनादि आणि अविनाशी असा आत्मा आहे ही गोष्ट होते, तथापि त्या आत्म्याच्या मुक्तीकरितां शरीराला तपाचे क्लेश देणें व्यर्थ

आहे. कारण, ज्ञानभावनेनेंच मुक्ति होते असें पूर्वी सांगितलें आहे, असें जर कोणी म्हणेल तर आचार्य सांगतात. बाबारे, कायक्लेश सोसल्यावांचून मृदु उपायानें जरी ज्ञानचिंतनाचा अभ्यास केला अर्थात् आत्मा हा शरीरादिकापासून भिन्न आहे अशाप्रकारचें भेदज्ञान होऊन जरी परमात्म्याचें चिंतन केलें, तरी शरीराला दुःख होऊं लागलें कीं, ज्ञान कमी होऊं लागतें; स्थिर न राहतां तें नष्टही होतें. असें असल्याकारणानें मुनीनें किंवा अंतरात्मा योग्यानें आपल्या शक्तीप्रमाणें कायक्लेश सोसूनच सर्वदां स्वस्वरूपाचें चिंतन करावें. म्हणजे तें चिंतन दृढ होतें. अशाप्रकारें कष्ट सहिष्णु झालेल्या आत्म्याच्या ज्ञानाचा नाश होण्याचा संभव नसतो.

ननु यद्यात्मा शरीरात्सर्वथा भिन्नस्तदा कथमात्मनि चलति नियमेन तच्चलेत् तिष्ठति तिष्ठेदिति वदन्तं प्रत्याह—

प्रयत्नादात्मनो वायुरिच्छाद्वेषप्रवर्तितात् ॥
वायोः शरीरयन्त्राणि वर्तन्ते स्वेषु कर्मसु ॥ १०३ ॥

टीका— आत्मनः सम्बन्धिनः प्रयत्नाद्वायुः शरीरे समुच्चलति कथम्भूतात् प्रयत्नात्? इच्छाद्वेषप्रवर्तितात् रागद्वेषाभ्यां जनितात् । तत्र समुच्चलिताच्च वायोः शरीरयन्त्राणि शरीराण्येव यन्त्राणि शरीरयन्त्राणि । किं पुनः शरीराणां यन्त्रैः साधर्म्यं यतस्तानि यन्त्राणीत्युच्यन्ते? इति

चेत् उच्यते—यथा यन्त्राणि काष्ठादिविनिर्मितसिंहव्याघ्रादीनि स्वसाध्यविविधक्रियायां परप्रेरितानि प्रवर्तन्ते तथा शरीराण्यपीत्युभयोस्तुल्यता । तानि शरीरयन्त्राणि वायोः सकाशाद्वर्तन्ते । केषु ? कर्मसु । कथम्भूतेषु ? स्वेषु स्वसाध्येषु ॥

अर्थ—आतां जर आत्मा हा शरीरापासून सर्वथा भिन्न असा आहे, तर मग आत्मा चलन पावला कीं शरीर चलन पावतें, व आत्मा निश्चल झाला कीं शरीर निश्चल होतें, असें अगदीं नियमानें कसें व्हावें ?—ह्या शंकेचा निरास आचार्य करतात—रागद्वेषादिकांनीं उत्पन्न झालेल्या आत्म्याच्या प्रयत्नानें शरीरांत वायु उच्चलित होतो; आणि त्या वायूच्या हालण्यानें यंत्राप्रमाणें असलेलीं हीं शरीरें आपापल्या कृत्यास प्रवृत्त होतात. ज्याप्रमाणें सिंह, वाघ इत्यादिकांची केलेलीं कळसूत्रीं चित्रें कोणीतरी त्याची कळ दाबून त्यांना प्रेरणा केली म्हणजे योग्य तऱ्हेनें हालूं लागतात, त्याप्रमाणेंच हीं शरीरेंही आंतील वायूच्या प्रेरणेनें हालूं लागतात. म्हणून ह्यांनाही यंत्रच म्हटलें आहे; असें समजावें.

तेषां शरीरयन्त्राणामात्मन्यारोपानारोपौ कृत्वा जडविवेकिनौ किं कुर्वत इत्याह—

तान्यात्मनि समारोप्य साक्षाण्यास्ते सुखं जडः ॥
त्यक्त्वाऽऽरोपं पुनर्विद्वान् प्राप्नोति परमं पदम् ॥ १०४ ॥

टीका—तानि शरीरयन्त्राणि साक्षाणि इन्द्रियसहितानि आत्मनि समारोप्य गौरोऽहं सुलोचनोऽहमित्याद्यभेदरूपतया आत्मन्यध्यारोप्य जडो बहिरात्मा असुखं सुखं वा यथा भवत्येवमास्ते। विद्वानन्तरात्मा पुनः प्राप्नोति किं तत्परमं पदं मोक्षं। किं कृत्वा? त्यक्त्वा। कं? आरोपं शरीरादीनामात्मन्यध्यवसायम्॥

अर्थ—हीं जीं वर शरीररूपीं यंत्रें सांगितलीं त्यांना आत्मा असें समजून अविचारी जीव, व त्यांच्याहून भिन्न आत्मा आहे असें समजून विचारी जीव (अंतरात्मे) काय करतात अर्थात् शरीराला आत्मा समजून चाललें असतां काय होतें आणि शरीराहून भिन्न आत्मा मानून चाललें असतां काय होतें, तें ह्या श्लोकांत आचार्य सांगतात—इंद्रियांशींसहवर्तमान असलेल्या शरीरांना आत्मा मानल्यामुळें अज्ञानी असा बहिरात्मा संसाराचें दुःख भोगीत असतो. आणि शरीराला आत्मा समजण्याचें सोडून दिल्यामुळें ज्ञानी असा अंतरात्मा उत्कृष्ट पदाला म्हणजे मोक्षाला प्राप्त होतो.

कथमसौ तं त्यजतीत्याह— अथवा स्वकृतग्रन्थार्थमुपसंहृत्य फलमुपदर्शयन्मुक्त्वेत्याह—

मुक्त्वा परत्र परबुद्धिमहंधियं च।
संसारदुःखजननीं जननाद्विमुक्तः॥

ज्योतिर्मयं सुखमुपैति परात्मनिष्ठ- ।
स्तन्मार्गमेतमधिगम्य समाधितन्त्रम् ॥ १०५ ॥

टीका— उपैति प्राप्नोति किं तत् ? सुखं । कम्भूतं ? ज्योतिर्मयं ज्ञानात्मकं । किं विशिष्टः सनसौ तदुपैति ? जननाद्विमुक्तः संसाराद्विशेषेण मुक्तः । ततोमुक्तोऽप्यसौ कथम्भूतः सम्भवति ? परमात्मनिष्ठः परमात्म-स्वरूपसंवेदकः । किं कृत्वाऽसौ तन्निष्ठः स्यात् । मुक्त्वा । कां ? परात्म-बुद्धिं । अहंधियं च स्वात्मबुद्धिंच । क ? परत्र शरीरादौ । कथम्भूतां ? संसारदुःखजननीं चातुर्गतिकदुःखोत्पत्तिहेतुभूतां । यतस्तथाभूतां तां त्यजेत । किं कृत्वा ? अधिगम्य । किं तत् ? समाधितन्त्र समाधेः परमात्मस्वरूपसंवेदनैकाग्रतायाः परमोदासीनताया वा तन्त्र प्रतिपादकं शास्त्रं । कथम्भूतं तत् ? तन्मार्गं तस्य ज्योतिर्मयसुखस्य मार्गमुपायमिति ॥

मोक्षप्राप्तीचें तंत्र येथें दाखविलें आहे.

अर्थ—आतां आपण केलेल्या ग्रंथांतील अर्थ थोडक्यांत सांगून ( उपसंहार करून ) त्याचें फल दाखविण्याकरितां आचार्य म्हणतातः- दुसऱ्याचें शरीर हा दुसरा आत्मा होय, आणि माझें शरीर हाच मी होय अशी जी शरीराविषयीं आत्मबुद्धि आहे ती दुःख देणारी असल्यामुळें तिचा त्याग करून, जो भव्यजीव अंतरात्मा झाला, त्यानें समाधीचें म्हणजे परमात्मस्वरूपाचें चिंतन करीत असतांना अत्यंत

उदासीन भावनेनें चित्ताची एकाग्रता किंवा समाधि कशी राखावी याचें ज्यांत प्रतिपादन केलें आहे अशा ह्या समाधितंत्र शतक नांवाच्या शास्त्राचा स्वीकार केल्यानें तो जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त होऊन अनंतज्ञानमय अशा परम सुखाला ( मोक्षसुखाला ) प्राप्त होतो. कारण, हें समाधिशतक नांवाचें शास्त्र त्या ज्ञानमयसुखाचा मार्ग दाखविणारें आहे. समाधितंत्र म्हणजे मोक्षलक्ष्मी मिळविण्याचें तंत्र काय आहे हें यांत दिग्दर्शित केलें आहे.

येनात्मा बहिरन्तरुत्तमभिदा त्रेधा विवृत्योदितो ।
मोक्षोऽनन्तचतुष्टयामलवपुः सध्यानतः कीर्तितः ॥
जीयात्सोऽत्र जिनः समस्तविषयः श्रीपादपूज्योऽमलो ।
भव्यानन्दकरः समाधिशतकश्रीमत्प्रभेन्दुः प्रभुः ॥ १ ॥

इति श्रीपण्डितप्रभाचन्द्रविरचिता समाधि-
शतकटीका समाप्ता.

प्रशस्तिश्लोकार्थ—ज्यानें बहिरात्मा, अंतरात्मा आणि परमात्मा असे आत्म्याचे तीन भेद करून त्यांचें स्वरूप विस्तारानें वर्णन केलें, ज्यानें अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतवीर्य आणि अनंतसुख ह्या अनंतचतुष्टयानें युक्त असलेला म्हणजे

अनंतचतुष्टयस्वरूप असलेला असा निर्दोष मोक्ष परमात्म-ध्यानापासून प्राप्त होतो असें प्रतिपादन केलें, ज्याला सर्वविषयांचें अविकलज्ञान आहे, तो निर्दोष आणि भव्यजीवांना आनंद देणारा-समाधिशतकरूपी उज्वलकांतीनें युक्त असा-चंद्रच कीं काय असा

श्रीपूज्यपाद जिन

ह्या जगांत उत्कर्ष पावो,

अशी आशा करतों.

समाप्त.

# आमचेकडे खालील

# ग्रंथ धर्मार्थ मिळतात.

पोस्टेज पाठविणें. प्रत्येक प्रतीस दीड अ
याप्रमाणें आपणांस पाहिजे तितक्या
प्रतीचें पोस्टाचें हांशील पाठविणें.

१. श्रीजिनार्चापद्यावली.
२ श्रीपायसागर चरित्र आणि मुनिपूजेसह संगीत पद्यें.
३ मराठी सुप्रभातस्तोत्र आणि कल्याणालोचनापाठ.
४ त्रिमूढताखंडन.
५. अशौचनिर्णय.
६. धार्मिकसंवाद.
७ आहारदानविधि.
८ श्रीनंदीश्वरपूजा आणि भक्ति.
९. रयणसार.
१० दयाधर्मानुशासन.
११. शंकानिर्णय.
१२ सटिकसार्थ-समा

पत्ता: —— व्यवस्थापक,

श्रीजिनवाणी प्रसारक.... दि० जैन शास
पो. मु. माळगांव ( सं. मिरज ) अ

---

मराठी पद्यात्मक श्रीभरतेशवैभव आणि श्रीपरमात
लौकरच छापणार आहोत. उदार धनिक दात्यांनी
आश्रय देऊन आपल्या चंचल लक्ष्मीचा सदुपयोग करा.